# नवभारत

वर्ष ९ वें ] फेब्रुवारी १९५६ [ अंक ५ वा



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.

अनुक्रमणिका









नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

## निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष नववें
अंक पांचवा

# नवभारत

फेब्रुवारी
१९५६

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. गोवर्धन पारीख
प्रा. वि. म. बेडेकर का. संपादक



**वार्षिक रु. ९** **सहामाही रु. ५** **अंकास रु. १**

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
९०६ शिवाजी नगर, पुणें ४

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ' नवभारत ' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस वाई ( जि. सातारा )

# 'नवभारत' मासिक, फेब्रुवारी १९५६

## —लेखक-परिचय—

[ खालीं दिलेल्या लेखकांशिवाय, या अंकांतील इतर लेखकांचा परिचय या वर्षी यापूर्वी त्यांचे लेख आले *त्या वेळीं दिला आहे-- का. सं.* ]

**प्रा. गंगाधर गाडगीळ** -- मुंबई येथील ' सिडनहॅम कॉलेज ऑफ कामर्स'मध्यें प्राध्यापक. मराठींतील सुप्रसिद्ध लघुकथालेखक.

**श्री. म. मु. शारंगपाणि** एम्. ए. ( पुणें ) -- तत्त्वज्ञान व मानसशास्त्र यांचे व्यासंगी.

**श्री. वि. ज. सहस्रबुद्धे** ( मिरज ) — छंदःशास्त्रावरील व्यासंगी लेखक.

**प्रा. भा. शं. भणगे**--मुंबई येथील ' आर्. ए. पोतदार कॉलेज ऑफ कामर्स अँन्ड एकॉनॉमिक्स्'मध्यें अर्थशास्त्राचे प्राध्यापक. ' Economic Analysis ' या पुस्तकाचे लेखक.

**श्री. इन्दुमती शेवडे** एम्. ए. ( नागपूर ) — चित्रकला व साहित्य यांच्या व्यासंगी व लेखिका. नागपूर येथील 'तरुण भारता'च्या ' महिलांचें मनोगत ' या विभागाच्या संपादिका. 'नागपूर टाइम्स' मधून चित्रकलेवर यांची लेखमाला पूर्वी प्रसिद्ध झाली आहे.

**डॉ. नारायण र. देशपांडे** —एम्. ए., एल्एल्. बी. पीएच्डी ( कोलं.). – पुणें विद्यापीठांत राज्यशास्त्र-विभागाचे प्राध्यापक व प्रमुख.

**श्री. के. नारायण काळे** बी. ए. एल्एल्. बी. ( पुणें ) – महाराष्ट्रांतील प्रसिद्ध नाट्य-चित्रपट-दिग्दर्शक, पटकथालेखक. ' सहकारमंजरी ' ( काव्यसंग्रह ), ' प्रयोजन ' ( अनुवादित नाटक ) यांचे लेखक.

**सौ. मुक्ताबाई दीक्षित** एम्. ए. ( पुणें ) — ' मानसलहरी ', ' अनिरुद्ध प्रवाह' ' जुगार ' या पुस्तकांच्या लेखिका.

**श्री. रोहिणी भाटे** बी. ए. ( पुणें ) — पुणें येथील ' नृत्यभारती ' या संस्थेच्या चालक. नृत्यावरील व्यासंगी तज्ज्ञ. ' माझी नृत्यसाधना ' या पुस्तकाच्या लेखिका.

**कु. सिंधु गोखले** — बी. ए. बी. टी. -- पुणें येथील पटवर्धन हायस्कूलमध्यें शिक्षिका.

**डॉ. मु. ग. पानसे** बी. ए. पीएच्. डी. -- पुणें येथील ' डेक्कन कॉलेज पोस्टग्रॅज्युएट ॲन्ड रिसर्च इन्स्टिट्यूट'मध्यें कार्यकर्ते. ' Linguistic Peculiarities of Jnaneshwari ' या पुस्तकाचे लेखक.

---

चुकीची दुरुस्ती

' नवभारता 'च्या गेल्या जानेवारी १९५६ च्या अंकांत श्री. र. के. खाडिलकर यांच्या कै. आचार्य जावडेकरांवरील लेखांत पान ६६ वर पहिल्या स्तंभांत खालून १४ व्या ओळींत सुरू होणारें वाक्य पुढीलप्रमाणें वाचावें -- " तरी सुद्धां आचार्य जावडेकर यांना मार्क्सवादी विचाराचे प्रणेते असें म्हणतां येणार नाहीं. गांधीवादी विचाराचे एक प्रभावी भाष्यकार या नात्यानें त्यांनीं केलेली कामगिरी मात्र मोठी आहे ही गोष्ट नमूद करणें अत्यंत उचित होईल. "

अनुक्रमणिका

प्रा. गंगाधर गाडगीळ

# वास्तवता : एक वाङ्मयीन मूल्य ?

ललित साहित्यांत वास्तवता असावी असा विचार पाश्चिमात्त्य टीकाकारांनीं मांडलेला आहे. आणि महाराष्ट्रांत देखील वास्तवता हें एक महत्त्वाचें कला-मूल्य आहे ही भूमिका गेल्या तीस-चाळीस वर्षांत बहुसंख्य टीकाकारांनीं घेतलेली आहे. पुष्कळांचें मत तर असें आहे कीं ललित साहित्य हा मानवी जीवनाचा आरसा आहे. वास्तवतेचें चित्रण करण्याच्या हेतूंतूनच ललित साहित्याची निर्मिति होते. ह्यामुळें वास्तवतेच्या निकषावर कलाकृती पारखल्या जाऊं लागल्या व जात आहेत.

## वास्तवता : भिन्न भिन्न कल्पना

वास्तवतेचा वाङ्मयीन मूल्य म्हणून स्वीकार केला गेल्यावर, त्या अनुषंगानें इतर विचार व्यक्त होऊं लागले. हरिभाऊ आपटयांचें वाङ्मय सदाशिवपेठी म्हणजेच समाजांतल्या एका लहानश्या वर्गाचें चित्रण करणारें म्हणून टीकेस पात्र झालें. समाजांतील बहुसंख्य माणसें ज्या प्रकारचें जीवन जगतात त्याचें चित्रण करणारें साहित्य श्रेष्ठ दर्ज्याचें असतें, अशा प्रकारचे विचार व्यक्त होऊं लागले. त्याचप्रमाणें भूतकाळांतील जीवनाचें चित्रण करण्यापेक्षां वर्तमानकालांतील जीवनाचें चित्रण करणें अधिक चांगलें असेंहि टीकाकार सूचित करूं लागले. ह्याच सुमारास मार्क्सवादाची लाल वावटळ महाराष्ट्रांत येऊन पोहोंचली; आणि वास्तवता ह्या वाङ्मयीन मूल्याला एक नवीनच अर्थ व महत्त्व प्राप्त झालें. श्रीमंत व गरीब ह्यांच्यांतील वर्गकलह हीच वास्तवजीवनांतील सर्वांत महत्त्वाची गोष्ट आहे असें मार्क्सवादी प्रतिपादन करूं लागले. आणि ह्या वर्गकलहाचें प्रभावी चित्रण करणारें साहित्यच श्रेष्ठ दर्ज्याचें असा आग्रह त्यांनीं धरला. गॉर्कीच्या इतर अतिशय सुंदर कलाकृतींपेक्षां त्याच्या 'मदर' या कलादृष्ट्या हिणकस असलेल्या कादंबरीचा अवास्तव उदोउदो होऊं लागला.

मार्क्सवादी विचारवंत ह्याहिपुढें जाऊन असें म्हणूं लागले कीं समाजांतील वर्गकलहांत अखेर दलितांचा विजय होऊन समाजवादाची स्थापना होणें अपरिहार्य आहे, ही भविष्यकालांतील वास्तवता आहे, आणि खऱ्या पुरोगामी साहित्यिकानें दलितवर्गाच्या ह्या भविष्यकालांतील उज्ज्वल विजयाचें चित्रण करणें हें आपलें कर्तव्य मानलें पाहिजे.

मार्क्सवाद्यांप्रमाणेंच गांधीवादी, समाजवादी, राष्ट्रवादी वगैरे विचारवंतांच्या सामाजिक वास्तवतेविषयीं स्वतःच्या अशा ठाम कल्पना होत्या व आहेत. सामाजिक जीवनांतील अमके प्रवाह महत्त्वाचे असें प्रत्येक पक्षाचें मत आहे आणि ह्या प्रवाहांचें चित्रण ज्या साहित्यांत होतें तेंच अधिक वास्तव असें प्रत्येक पक्ष प्रतिपादन करीत असतो.

अर्थात् निव्वळ वास्तवता हेंच एकमेव साहित्यमूल्य आहे असें म्हणणारे लोक फारच थोडे. वास्तवजीवनाचें चित्रण करून सामाजिक प्रश्नांना वाचा फोडणें, समाजाची जागृति करणें, आणि सामाजिक प्रश्न सोडवायला उपयुक्त असा ध्येयवाद जनतेपुढें ठेवणें हें देखील साहित्याचें कार्य आहे असें बहुसंख्य टीकाकार म्हणत असतात. मार्क्सवादी लोक तर साहित्याला क्रांतीचें साधन समजतात. क्रांति यशस्वी होण्यास उपयुक्त असें जें साहित्य तें चांगलें साहित्य असें त्यांचें मत आहे. अर्थात् प्रत्येक विचारवंताला मान्य असलेला ध्येयवाद निराळा असतो आणि तो ज्या साहित्यांतून व्यक्त होतो तें चांगलें साहित्य असें तो म्हणत असतो.

साहित्यांत ध्येयवाद असावा कीं नाहीं, अगर असूं शकतो कीं नाहीं ह्या प्रश्नाचा मला येथें स्वतंत्र विचार करायचा नाहीं. पण साहित्यांत ध्येयवाद असावा ही भूमिका साहित्यांत वास्तवजीवनाचें चित्रण असावें ह्या भूमिकेशीं संलग्न आहे व कांहीं अंशीं त्या भूमिकेंतून ती निर्माण झाली आहे; म्हणून तिचा उल्लेख येथें अपरिहार्यपणें करावा लागत आहे.

साहित्य ही एक कला आहे. आणि कलाकृतीचे म्हणून कांहीं गुणधर्म असतात, ह्या गोष्टीकडे वास्तववादाचे पुरस्कर्ते दुर्लक्ष करूं शकत नाहींत. त्यामुळें साहित्यांत वास्तवजीवनाचें जें चित्रण असतें तें कलात्मक रीत्या केलेलें असतें असेंहि ते म्हणत असतात. ह्याचा अर्थ असा कीं कलेचीं म्हणून कांहीं निराळीं मूल्यें असतात आणि त्या मूल्यांच्या आधारें एखादी कृति ही कलाकृति आहे कीं नाहीं हें ठरवायचें असतें. ह्या गोष्टीला ते मान्यता देतात. पण ह्या








मूल्यांना ते दुय्यम स्थान देतात आणि त्यांचें बहुतेक साहित्य-समीक्षण साहित्यांत ज्या वास्तवतेचें चित्रण होतें तिच्या स्वरूपावरच आधारलेलें असतें.

ह्या भूमिकेंतील तत्त्व असें कीं एखाद्या शास्त्रीय स्वरूपाच्या ग्रंथांतील आशय व कलाकृतींतील आशय ह्यांमध्यें भेद नसतो. भेद असतो तो फक्त आशय व्यक्त करण्याच्या पद्धतींत. कलाकृतीचें म्हणून एक निराळें तंत्र असतें इतकेंच.

कांहीं टीकाकारांच्या मतें कोठल्याहि कलाकृतीचें मूल्यमापन हें कलेच्या पातळीवरच आणि कलामूल्यांच्या आधारेंच झालें पाहिजे. कलाकृतींत वास्तवतेचें कसें व किती प्रमाणांत चित्रण आहे, ह्या गोष्टीला ते तिचें मूल्यमापन करतांना महत्त्व देत नाहींत. पण त्यांचें म्हणणें असें कीं कोठच्याहि कलाकृतीनें अखेर वाचकाच्या मनाचा ठाव घेतला पाहिजे. (It must carry conviction). वाचकाला ती खरी आहे असें वाटलें पाहिजे. ह्याकरितां त्या कलाकृतींत चित्रित केलेल्या घटना वास्तव पाहिजेत. वास्तवतेला त्यांच्या दृष्टीनें महत्त्व आहे तें असें. – अर्थात् येथें 'वास्तव' ह्या शब्दाचा अर्थ जरा वेगळा आहे. वास्तव म्हणजे जें प्रत्यक्ष घडतें अगर जें सर्वसाधारणपणें घडतें तें नव्हें. येथें वास्तव म्हणजे शक्यतेच्या कोटींतलें.

वास्तवता हें एक वाङ्मयीन मूल्य आहे ही कल्पना अशा रीतीनें निरनिराळया कारणांमुळें दृढमूल झालेली आहे. परंतु ह्या कल्पनेचा व ती ज्यांवर आधारलेली आहे त्या विधानांचा जर अभ्यासपूर्वक परामर्श घेतला तर ती अत्यंत सदोष आहे असें आढळून येईल.

### 'जीवनाचा आरसा'?

आधीं जें अस्तित्वांत आहे व कोणालाहि प्रत्यक्ष पहातां येण्यासारखें आहे तेंच कलाकृतींत चित्रित केलेलें पहाणें वेडगळपणाचें आहे. एखादी सुंदर स्त्री अगर माणदेशांतील एखाद्या खेड्यांतील जीवन प्रत्यक्ष पहायचें सोडून त्यांचें कलाकृतींतील चित्रण पहाण्याचा खटाटोप शहाणा माणूस करणार नाहीं. अर्थात् कोणी असें म्हणतील कीं प्रत्यक्ष माणदेशांत जाणें कांहीं सर्वांनाच शक्य होत नाहीं, अगर शिवकालीन इतिहास वाचायचा सर्वसामान्य माणसाला कंटाळा येतो. तेव्हां अशा माणसांच्या सोयीकरितां 'माणदेशी माणसें' सारखा कथासंग्रह अगर 'उषःकाल' सारखी कादंबरी लिहिली जावी. ह्या भूमिकेवरून विचार करूं लागलें कीं कलाकृतीचा विषय जितका अपरिचित अगर विलक्षण तितकी ती कलाकृति अधिक उपयुक्त व म्हणून चांगली असा निष्कर्ष निघतो. आणि कलाकृति व प्रवासांत वापरण्याचें गाइड-बुक हीं दोन्हीं कांहीं बाबतींत तरी एकाच पातळीवर येतात. पण मला वाटतें कीं कोठच्याहि रसिकाला ही भूमिका मान्य होणार नाहीं. कारण त्याच्या अनुभवाशीं ती जुळणारी नाहीं. नित्य परिचयाच्या विषयावर आधारलेली कलाकृति देखील श्रेष्ठ असूं शकते. आणि गुप्त-पोलिसाच्या चातुर्याची कथा पुष्कळदां रटाळ असते.

शिवाय कोठच्याहि वास्तवप्रसंगाचें अगर व्यक्तीचें चित्रण केलें अगर आज सकाळपासून रात्रींपर्यंत मुंबईत काय घडलें त्याचें वर्णन केलें तर त्या वर्णनाला कलाकृति हें नांव देतां येणार नाहीं. ह्या वर्णनाची भाषा अगर पद्धति जरी कथाकादंबऱ्यांत आढळते तशी असली तरी त्यांमुळें देखील तें वर्णन म्हणजे एक कलाकृति ठरणार नाहीं. पण ललितवाङ्मय हा वास्तवजीवनाचा आरसा आहे ही भूमिका जर मान्य केली तर त्या वर्णनाला कलाकृति म्हणावें लागेल.

वास्तवतेचे पुरस्कर्ते देखील कोठच्याहि प्रसंगाच्या अगर प्रसंगमालिकेच्या वर्णनास कलाकृति म्हणणार नाहींत. आणि प्रत्यक्षांत जें पहायला मिळतें त्याचेंच केवळ कलाकृतीच्या द्वारेंहि आपल्याला दर्शन घडतें असेंहि ते म्हणणार नाहींत. ह्याचाच अर्थ असा कीं वास्तवतेच्या चित्रणाहून अधिक कांहींतरी कलाकृतींत असावें लागतें हें त्यांना मान्य आहे. हें 'अधिक कांहींतरी' काय असतें? कलाकृतींत नुसत्या वास्तवतेचें चित्रण नसतें तर त्या वास्तवतेंत कलावंतानें कांहींतरी संगति निर्माण केलेली असते; त्या वास्तवतेचा कांहींतरी अर्थ लावलेला असतो, असेंच उत्तर ह्या प्रश्नाला वास्तवतेचे पुरस्कर्ते देतील.

### 'जीवनाचा अर्थ'?

त्यांची भूमिका अशी कीं कलावंत हा जीवनाचा अर्थ लावीत असतो: 'शेवटीं सत्याचाच जय होतो', 'प्रेमानें अगदीं कुटिल माणसाचें हृदय देखील जिंकतां येतें,' 'दलित वर्गाचाच वर्गकलहांत विजय होणार', 'माणुसकी हें मूल्य मानण्यांतच माणसाचें जीवित-












साफल्य आहे ' अशा प्रकारचें सत्य तो वाचकाला सांगत असतो.

पण ह्या बाबतींत दोन अडचणी उद्भवतात. एक अशी कीं मोठमोठ्या कलाकृतींतून सांगितलेलीं अशा प्रकारचीं सत्यें जर आपण तपासून पाहिलीं तर तीं अगदीं सामान्य स्वरूपाचीं असल्याचें आढळून येतें. तीं कोठच्याहि शहाण्यासुर्त्या माणसास माहीत असतात. आणि त्यांचें ज्ञान करून घेण्याकरितांच जर साहित्य वाचायचें असेल अगर कलाकृतींचें रसग्रहण करायचें असेल तर बहुतेक माणसें साहित्याच्या वाटेस जाणार नाहींत. शिवाय कलाकृतींतून जें व्यक्त होतें त्याहून अधिक गुंतागुंतीचें, अवघड व जीवनावर अधिक प्रकाश पाडणारें (असल्या प्रकारचें) सत्य शास्त्रीय अगर तत्त्वज्ञानाच्या ग्रंथांतून सांगितलेलें असतें. मग साहित्य वाचण्याऐवजीं असले ग्रंथच कां वाचूं नये असा प्रश्न साहजिकपणें विचारता येईल.

ह्यावर दोन प्रकारचीं उत्तरें देतां येतील : पहिलें असें कीं सर्वसामान्य माणसांच्या अंगीं शास्त्रीय अगर तत्त्वज्ञानावरचे ग्रंथ वाचायला लागणारी बुद्धिमत्ता अगर चिकाटी नसते. म्हणून त्यांना शास्त्रीय स्वरूपाचीं सत्यें कलावंत सोप्या व आकर्षक स्वरूपांत सांगत असतो. ह्याच भूमिकेवरून हिंदुधर्मांत व खिश्चन-धर्मांतहि कथा, पुराणें व काव्यें यांना महत्त्व देण्यांत आलें आणि आचार्य जावडेकर साहित्य-संमेलनाच्या अध्यक्षपदावरून साहित्यिकांना सत्याग्रही समाजवादाचा पुरस्कार करायला सांगतात तेव्हां अप्रत्यक्षपणें त्यांची भूमिका हीच असते. महाराष्ट्रांत विद्वान् म्हणून गाजलेलीं (–महाराष्ट्रांत विद्वान् म्हणून गाजायला फारशी विद्वत्ता अंगीं असावी लागत नाहीं!–) अनेक माणसें ह्याच भूमिकेवरून ललित साहित्याकडे पहात असल्याचें त्यांच्या बोलण्यावरून आणि लिहिण्यावरून दिसून येतें. अर्थात् आपली भूमिका – मीं मांडली – इतक्या स्पष्टपणें हीं माणसें मांडीत नाहींत.

### शास्त्रीय सत्याची प्रतीति ?

कांहीं लोकांची भूमिका जरा वेगळी असते. ते म्हणतात कीं शास्त्रीय स्वरूपाचेंच सत्य कलावंत देखील सांगत असतो हें खरें. पण तो तें कलात्मकपणें सांगत असतो. त्याची तो वाचकाला प्रतीति देत असतो. ज्ञानमार्गानें सत्य कळतें. पण त्याचा कलात्मक आविष्कार झाल्याशिवाय तें प्रतीत होऊं शकत नाहीं. हे लोक अर्थात् कलावंताला थोडा अधिक मान देतात. शास्त्रज्ञाहून कलावंत कांहींतरी निराळें आणि महत्त्वाचें करतो, ही गोष्ट ते मानतात. पण कलावंत आणि शास्त्रज्ञ एकच गोष्ट सांगत असतात अशीच त्यांचीहि भूमिका असते.

कलावंत हा वास्तवजीवनाविषयीं शास्त्रीय अगर तात्त्विक स्वरूपाचें सत्य सांगत असतो हें जर मान्य केलें तर कांहीं अडचणी निर्माण होतात. शास्त्रीय सत्य शोधून काढण्याचा अगर सिद्ध करण्याचा मार्ग म्हणजे शास्त्रीय चिकित्सेचा. पण ही शास्त्रीय चिकित्सा कलाकृतींत असूं शकत नाहीं. तेव्हां कलावंतानें सांगितलें आहे तें सत्य आहे कीं नाहीं हें वाचकाला केवळ कलाकृति वाचून कळणार नाहीं. आणि कलावंताला देखील आपण कलाकृतींतून सत्य-दर्शन केलें आहे कीं नाहीं हें कलाकृतीच्या द्वारें सांगतां येणार नाहीं. त्याकरितां त्याला शॉप्रमाणें स्वतंत्र प्रस्तावना लिहाव्या लागतील. म्हणजेच कलाकृतींचें रसग्रहण व मूल्यमापन करतांना बाह्य गोष्टींना प्रमुख स्थान द्यावें लागेल. शिवाय एखाद्या कलावंतानें नवीन निर्मिति केली कीं नाहीं हें ठरविण्याकरितां त्यानें कांहीं नवीन शास्त्रीय अगर तात्त्विक सत्य सांगितलें आहे कीं नाहीं तें पहावें लागेल. आणि ही भूमिका एकदां मान्य केली कीं शेक्स्पिअरनें आणि बहुतेक इतर श्रेष्ठ कलावंतांनीं कांहींच नवीन निर्मिति केली नाहीं असा निष्कर्ष काढावा लागेल. पण असला निष्कर्ष काढायला वास्तववादाचे पुरस्कर्ते धजतील असें वाटत नाहीं.

शिवाय कोठच्याहि रसिक वाचकाचा अनुभव असा असतो कीं कलाकृतीपासून आपल्याला जें कांहीं मिळतें तें तार्किक स्वरूपाच्या विधानांत अंतर्भूत होऊं शकत नाहीं. अर्थात् श्री. बेडेकरांच्यासारखे टीकाकार पुष्कळशा कलाकृतींच्या बाबतींत असें करूं शकतात. (असं करतांना ते जीं अवतरणें देतात तीं नेहमीं पहाण्यासारखीं असतात. काव्यदृष्ट्या तीं बहुधा हिणकस अगर वैशिष्ट्यहीन असतात.) पण कांहीं कलाकृती, विशेषतः कविता अशा असतात कीं त्यांतील सत्य तार्किक स्वरूपाच्या विधानांच्या द्वारें मांडणें पूर्णपणें अशक्यच असतें. बालकवींच्या अशा कित्येक











कविता आहेत. मग अशा वेळीं कवीनें काव्यांतून कोणतें सत्य सांगितलें आहे असें समजायचें ? कीं त्यांत कांहीं सत्यच नसतें असें समजायचें ?

### तार्किक पातळी व कलात्मक पातळी

कलाकृतींत नुसतें वास्तव-जीवनाविषयींचें सत्य नसतें, तर तें कलात्मक रीत्या व्यक्त झालेलें असतें— कलावंत त्यांची प्रतीति आणून देत असतो असें वास्तवतेचे पुरस्कर्ते म्हणत असतात. ह्या भूमिकेच्या मुळाशीं अशी कल्पना आहे कीं कलावंताची जी अभिव्यक्तीची पद्धति आहे तिच्या द्वारें तार्किक स्वरूपाचें सत्य व्यक्त होऊं शकतें. ही कल्पना कितपत खरी आहे तें आपण तपासून पाहिलें पाहिजे.

साहित्यांत वास्तवतेचें चित्रण व्हायचें व तिचा अर्थ लावायचा म्हणजे दोन गोष्टी आवश्यक असतात. एक अशी कीं लेखकाची भूमिका वस्तुनिष्ठ हवी. आणि दुसरी अशी कीं त्यानें कलाकृतींतून एका विशिष्ट घटनेचें चित्रण न करतां सर्वसामान्य स्वरूपाचीं विधानें केलीं पाहिजेत. पण कलावंत ह्यांपैकीं एकहि गोष्ट करीत नसतो. तो एखाद्या परिस्थितीचें चित्रण करीत नसतो तर त्यांत परिस्थितीच्या आपल्याला आलेल्या अनुभवाचें चित्रण करीत असतो. परिस्थिति हें त्या अनुभवाचें निमित्त असतें. आणि कांहीं मर्यादित प्रमाणांत ती त्या अनुभवाचें स्वरूपहि ठरवीत असते. पण मुख्यतः त्या अनुभवाचें स्वरूप लेखकाच्या व्यक्तिमत्त्वावरून ठरत असतें. त्याचप्रमाणें साहित्यिक सर्वसामान्य स्वरूपाचीं विधानें करीत नसतो. ( तो तशीं करतो असें कधीं कधीं वाटतें. पण तें खरें नसतें. येथें या विषयाचा विस्तार मी करीत नाहीं. त्यावर एक स्वतंत्र लेख मी लिहिणार आहे. ) बहुधा तो एका व्यक्तीविषयीं अगर विशिष्ट घटनेविषयीं लिहीत असतो. अधिक कांटेकोरपणें लिहायचें म्हणजे तो एक विशिष्ट अनुभव व्यक्त करीत असतो. ह्यामुळें कलावंताची जी अभिव्यक्तीची पद्धति आहे तिच्या द्वारें वास्तवतेचें वस्तुनिष्ठ चित्रण होणें अशक्य असतें. तेव्हां कलावंत कलात्मक पद्धतीनें लिहीत असतो असें म्हटलें म्हणजे तो वास्तवतेचें चित्रण करतो असें म्हणतां येत नाहीं.

रिचर्ड्सच्या भाषेंत सांगायचें म्हणजे कलावंत हा शास्त्रज्ञाप्रमाणें Statement करीत नसतो तर Pseudo-Statement करीत असतो. त्यामुळेंच एका कलावंतानें निराशेचें चित्रण केलें आणि दुसऱ्यानें आशेचें चित्रण केलें तर ह्या दोघांपैकीं एक कोणीतरी बरोबर आहे असा निष्कर्ष वाचकाला काढावा लागत नाहीं. दोघांचेंहि म्हणणें एकाच वेळीं खरें असूं शकतें. त्याचप्रमाणें, केशवसुतांनीं एका जागीं ' माझिया तर जीवितीं तिमिर सारें ' असें म्हटलें आणि दुसऱ्या ठिकाणीं ' तम अल्प द्युति बहु ' असें म्हटलें तर त्या दोन विधानांची सांगड घालतांना श्री. बेडेकर यांची जशी तिरपीट उडाली आहे ( ' नवभारत ', डिसेंबर १९५५, पान ३२ ) तशी तिरपीट उडण्याचेंहि कांहीं कारण नाहीं. कारण हीं दोन विधानें तार्किक पातळीवर विरोधी असलीं तरी कलात्मक पातळीवर तशीं नाहींत.

अगदीं भिन्न प्रकारचे अनुभव व भिन्न प्रकारचीं लेखकांचीं व्यक्तिमत्त्वें कलाकृतींतून व्यक्त होत असतात. आणि आपण त्या सर्व कलाकृतींचा सारख्याच आनंदानें रसास्वाद घेऊं शकतो ही नित्याच्या अनुभवाची गोष्ट आहे. ती अमान्य करण्याकरितां कारणें शोधून काढण्यांत बुद्धि वांया न घालवितां तिचीं कारणें शोधून काढण्याचा प्रयत्न करणें अधिक उपयुक्त ठरेल.

### जीवनाचें प्रातिनिधिक चित्रण ?

पण तरी ह्या अडचणींतून मार्ग काढण्याचा प्रयत्न वास्तवतेचे पुरस्कर्ते करीत असतातच. ते असें म्हणतात कीं कलावंत जरी एखाद्या विशिष्ट घटनेचें चित्रण करीत असला तरी ती घटना प्रातिनिधिक स्वरूपाची असते; जीवनांत नित्य घडणारी असते. त्यामुळें एका घटनेचें चित्रण करतांना तो वास्तवजीवनाविषयीं सर्वसामान्य असें कांहीं सांगत असतोच. अर्थात् कांहीं कलावंत अपवादात्मक असे विषय निवडीत असतात. पण हे कलावंत व त्यांची कला कमी प्रतीची असते.

ह्या भूमिकेबाबत दोन प्रकारच्या अडचणी निर्माण होतात. एक अशी कीं सर्वानुमतें श्रेष्ठ ठरलेल्या कलाकृतींचे विषय अपवादात्मक असल्याचें आढळून येतें. ' हॅम्लेट ' हें नाटक अगर ' ॲना कॅरेनिना ' ही कादंबरी तत्कालीन जीवनाचें प्रातिनिधिक चित्रण करणारी आहे असें म्हणणें कठीण आहे.

आणि तरी ह्या दोन्ही कलाकृती श्रेष्ठ दर्जाच्या आहेत असें मानलें जातें. अशा रीतीनें सर्वसंमत असे जे कांहीं कलाकृतींच्या श्रेष्ठत्वाविषयीं निर्णय आहेत त्या निर्णयाशीं ही भूमिका सुसंगत नाहीं.

शिवाय तर्कदृष्ट्या प्रातिनिधिकत्वाची कल्पना सदोष आहे. कोठचीहि गोष्ट इतर कोणत्याहि गोष्टीचें पूर्णांशानें प्रतिनिधित्व करूं शकत नाहीं. त्याचप्रमाणें अमुक एका वर्गांतल्या गोष्टींचेंहि ती सारख्याच प्रमाणांत प्रतिनिधित्व करूं शकत नाहीं. कारण त्या वर्गाच्या चौकटींतल्या कांहीं गोष्टी त्याच्या एका सीमेजवळ असतात, कांहीं दुसऱ्या सीमेजवळ असतात, तर कांहीं त्या चौकटीच्या मध्यभागीं असतात. तेव्हां अमका एक कामगार इतर सर्व कामगारांचा प्रतिनिधि आहे. असें फार मर्यादित अर्थानें म्हणतां येतें व तसें म्हणण्यांतहि अनेक धोके असतात. अर्थशास्त्रांत मार्शलनें 'प्रातिनिधिक कारखाना' ('representative firm') ह्या कल्पनेचा उपयोग करण्याचा प्रयत्न केला आणि ह्या प्रातिनिधिक कारखान्याच्या प्रश्नांची चर्चा करून तिच्या आधारें सर्वच कारखान्यांविषयीं निष्कर्ष काढण्याचा प्रयत्न केला. पण ह्यामुळें इतक्या अडचणी निर्माण झाल्या कीं ती कल्पनाच अखेर त्याज्य ठरविण्यांत आली. अशाच अडचणी साहित्यांत जीवनाचें प्रातिनिधिक चित्रण असावें असें म्हटलें तर उपस्थित होतील.

नव्हे, त्या अडचणी अधिक गंभीर स्वरूपाच्या असतील. कारण मार्शलनें जो 'प्रातिनिधिक कारखाना' निवडला तो एका विशिष्ट भूमिकेवरून निवडला. तो कारखान्यांकडे केवळ आर्थिक भूमिकेवरून पहात होता. त्या कारखान्यांतील माणसें कितपत मनमिळाऊ आहेत, ही गोष्ट त्यानें विचारांत घेतली नव्हती. पण साहित्यांत जें कामगाराचें चित्रण व्हायचें तें कांहीं तो केवळ वर्गकलहांतला एक घटक म्हणून होणार नाहीं. तो कितपत मनमिळाऊ आहे, ही गोष्टहि साहित्यिक चित्रित करील. नव्हे, त्याला ती करावीच लागेल. कारण त्याशिवाय त्या कामगाराचें संपूर्ण व्यक्तिमत्त्व निर्माण होणार नाहीं. तो कामगार जिवंतच होऊं शकणार नाहीं. ती कृति ही कलाकृतीच ठरूं शकणार नाहीं. पण मनमिळाऊपणाच्या निकषावर जर वर्गीकरण केलें तर तो कामगार प्रातिनिधिक असेलच असें म्हणतां येणार नाहीं. ह्याचाच अर्थ असा कीं प्रातिनिधिक अशा व्यक्तींची अगर घटनांची ललित साहित्यांत चित्रण करण्याकरितां निवड करणें अशक्य आहे. गोखल्यांची 'मंजुळा' ही मुंबईतील नोकरी करणाऱ्या मुलींची प्रतिनिधि आहे असें म्हणणें धाडसाचें आहे. आणि ह्या विधानाला शास्त्राला मान्य असलेल्या पद्धतीनें पुरावा देणें अशक्य आहे. पण टीकेच्या क्षेत्रांत जडजंजालाला बराच वाव असला तरी अशा कांटेकोरपणाला दुर्दैवानें वाव नाहीं.

शिवाय एखाद्या कथेंतील व्यक्ति ज्या प्रमाणांत सचेतन असते, त्या प्रमाणांत ती कथा ही कलाकृति ठरते. पण प्रातिनिधिकत्व ही एक कल्पना (concept) आहे; आणि म्हणूनच ती अचेतन आहे. त्यामुळें ज्या प्रमाणांत हें प्रातिनिधिकत्व एखाद्या कथेंतील व्यक्तीच्या अंगीं असेल त्या प्रमाणांत ती ठोकळेबाज ठरणार. रशियन साहित्यांत असलाच प्रकार घडत आहे. पण ही साधी गोष्ट लक्षांत यायला व मोकळेपणानें व्यक्त करायला एल्या युरेनबर्गला अनेक वर्षें लागलीं. मार्क्सवादाच्या आधारानें कोठचीहि गोष्ट समजायची म्हणजे इतका वेळ लागणारच म्हणा!

## व्यक्तित्वाचीं दोन टोंकें?

साहित्यांत सामाजिक परिस्थितीचें प्रतिबिंब उमटतें ही गोष्ट एका निराळ्या प्रकारें सिद्ध करण्याचा प्रयत्न होतो. श्री. मुक्तिबोधांनीं तसा प्रयत्न 'दिशा' या पुस्तिकेंत केला आहे. कलाकृतींत कलावंताच्या अनुभवाचा आविष्कार होतो ही गोष्ट ते मान्य करतात. अर्थातच ते ही गोष्टहि मान्य करतात कीं कलाकृतीच्या मुळाशीं माणसाचें व्यक्तिमत्त्व असतें. पण ते असें म्हणतात कीं "या व्यक्तित्वाचीं दोन टोंकें असतात. एक सहजप्रेरणांचें व दुसरें सामाजिक जाणीवेचें...... पहिलें सामाजिक जाणीवेचें टोंक. यांत व्यक्तीचीं जीं सामाजिक मूल्यें असतील वा ज्या वृत्ती असतील, जी वास्तवताविषयक 'concept of reality' असते ती अंतर्भूत असते. व्यक्तीला जी एक जीवनविषयक वस्तुनिष्ठा प्राप्त झालेली असेल ती या टोंकाला असते. दुसरें टोंक सहजप्रेरणांचें. हें पहिल्या टोंकाच्या क्रियाप्रतिक्रियांना अनुसरून भावना उत्पन्न करतें.... या दोन्हीं टोंकांच्या परस्परांवर क्रियाप्रतिक्रिया चाललेल्या असतात व यांत भावनेला विशिष्ट स्वरूप देणारें पहिलें सामाजिक जाणिवेचें टोंक असतें. म्हणूनच






व्यक्तित्वाचा कोणताहि अनुभव हा एका टोंकाला जी ' concept of reality ' असेल तिचा आविष्कार ठरतो. म्हणजे तो वैयक्तिक असूनहि जेवढ्यापुरती, जितकी व्यापक, ज्या पातळीवरील असते तेवढ्या जगांतील वास्तवतेचाहि तो आविष्कार ठरतो –" ( ' दिशा ' पृष्ट ६ ).

ह्या उताऱ्यांत विचारांचा जो गडबडगुंडा आहे तो सर्व उलगडण्याचें आपल्याला कारण नाहीं. मात्र जातां जातां कांहीं प्रश्न विचारावेसे वाटतात : व्यक्तिमत्त्वाचीं दोनच टोंकें आहेत असें कां मानायचें ? आणि तीं देखील टोंकेंच कां ? हें सगळें ' dialectics ' चा उपयोग करतां यावा म्हणूनच ना ? सहजप्रेरणांचें सामाजिकीकरण झालें आहे असें लेखांत आधीं म्हटल्यावर सहजप्रेरणा व सामाजिक जाणीव यांच्यांत भेद अगर विरोध कां कल्पायचा ? ' सहजप्रेरणांचें टोंक सामाजिक जाणिवेच्या क्रिया-प्रतिक्रियांना अनुसरून भावना उत्पन्न करतें ' हें विधान मानसशास्त्राला संमत होईल काय ? सामाजिक जाणीव म्हणजे काय ? ही संज्ञा ( term ) त्यांनीं आपल्या सर्व लेखांत एकाच अर्थानें वापरली आहे असें वाटत नाहीं.

मार्क्सवाद्यांचें विचार करायचें तंत्र व विचारांतून काढायचे निष्कर्ष आधींच ठरून गेलेले असतात. आणि त्याकरितां विषयाची ते कशी गळचेपी करतात त्याचें वरील उतारा म्हणजे उत्तम उदाहरण आहे.

## काव्याचा मूलभूत घटक : ' प्रतिमा '

असो. आपल्या दृष्टीनें ह्या उताऱ्यांतील एकच मुद्दा महत्त्वाचा आहे. तो असा कीं मानवी व्यक्तिमत्त्वाच्या मुळाशीं एक concept of reality असते. प्रत्येक माणसाच्या मनांत मूर्त वा अमूर्त स्वरूपांत एक concept of reality असते असें म्हटलें तर तें कदाचित् मान्य होईल. ( ह्या बाबतींत व्यक्तिशः माझा अनुभव असा आहे कीं मनःस्थितीनुरूप निरनिराळया concepts of reality आपल्या मनांत आहेत असें वाटतें. त्याची तार्किक संगति लावतां येतेच असें नाहीं व जीवनाची दिशा ती संगति लावण्यावर अवलंबून असते अशांतलाहि प्रकार नाहीं. ) पण ह्या concept of reality ला व्यक्तिमत्त्वाचा पाया मानणें मानसशास्त्राला मान्य होणार नाहीं. शिवाय concept of reality ला व्यक्तिमत्त्वाचा पाया मानलें तर व्यक्तिमत्त्वांतली संगति ही तार्किक असते असें मानावें लागेल. पण ही गोष्टहि मानसशास्त्राला मुळींच मान्य होणार नाहीं. त्याचप्रमाणें मुक्तिबोधांच्या भूमिकेंतून असेंहि सूचित होतें कीं काव्यांत जें कांहीं व्यक्त होतें तें concepts च्या चौकटींत बसवतां येतें व त्यांत एक conceptual संगति असते. पण काव्यांत व्यक्त होतात त्या concepts नसतात. concepts ह्या कोठच्याहि शास्त्राच्या मुळाशीं असतात. काव्याचा मूलभूत घटक ' प्रतिमा ' ( 'image' ) हा असतो. आणि ह्या प्रतिमांची संगति असते ती तार्किक नसून कलात्मक असते. तेव्हां माणसाच्या व्यक्तिमत्त्वाच्या मुळाशीं एक concept of realily असते असें जरी मान्य केलें तरी त्या concept चा व काव्याच्या व्यक्त होणाऱ्या अनुभवाचा कांहीं एक संबंध असतो हें सिद्ध करावें लागेल.

पण अशा प्रकारचा कांहीं निश्चित व अपरिहार्य संबंध आहे असें आढळून येत नाहीं. असे पुष्कळसे श्रेष्ठ कलावंत आहेत कीं त्यांच्या कलाकृतींतून एक निश्चित जीवितविषयक भूमिका शोधून काढतां येत नाहीं. पुष्कळदां एकाच कलावंताच्या निरनिराळया कलाकृतींत निरनिराळया परस्परविसंगत भूमिका असतात. आणि लेखकाची जीवितविषयक भूमिका व त्याच्या कलाकृतीचें स्वरूप वा उंची ह्यांचा मेळ बसवणें तर फारच कठीण आहे. असो. मुक्तिबोधांना आपण येथेंच सोडूं या.

## यथातथ्य चित्रण अनुभवाचें, वास्तवतेचें नव्हे

कलाकृतींतून वास्तवतेचें चित्रण होतें असें जेव्हां म्हटलें जातें तेव्हां असेंहि सूचित होतें कीं वास्तवतेचें स्वरूप कळावें म्हणूनच आपण कलाकृती वाचीत असतों. पण असें जर असेल तर भूतकाळांतील कलाकृतींत आपलें मन रमूं नये. निदान आजच्या कलाकृतींत रमतें तेवढें रमूं नये. त्या आजच्या कलाकृतींइतक्या ताज्या अगर अर्थपूर्ण वाटूं नयेत. पण तसें होत नाहीं. 'शारदा' नाटक आपल्याला अजूनहि ताजें वाटतें. शेक्सपिअरचीं नाटकेंहि ताजीं व अत्यंत अर्थपूर्ण वाटतात. तीं अर्थपूर्ण कां वाटतात याचें स्पष्टीकरण वास्तवतेच्या पुरस्कर्त्यांनीं करणें आवश्यक आहे.



अनुक्रमणिका








कांहीं लोकांचें मत असें कीं कलाकृतींत वास्तवता असल्याशिवाय ती मनाला जाऊन भिडत नाहीं. एखादा मनुष्य २० नंबरच्या ट्रॅममधून गिरगांवांत गेला असें म्हटलें तर वाचकाला तें पटत नाहीं. पण ही भूमिका देखील सदोष आहे. कारण 'ॲलिस इन् वंडर्लंड', 'गलिव्हर्स ट्रॅव्हेल्स', 'ॲण्डर्सन्स फेअरी टेल्स' हीं पुस्तकें वास्तवावर आधारलेलीं नाहींत. त्यांत अशक्य तें घडतें आणि तरी तीं मनाला पटतात. कोणी म्हणेल कीं तीं पुस्तकें पूर्णपणें Fantasy च्या पातळीवरचीं आहेत म्हणून त्यांच्या बाबतींत ही अडचण भासत नाहीं. पण वास्तवतेच्या पातळीवर लिहिलेल्या कलाकृती नेहमींच त्या पातळीवर राहिल्या पाहिजेत. तशा त्या राहिल्या नाहींत तर त्या वाचकाच्या मनाला जाऊन भिडणार नाहींत. पण हें विधान देखील खरें वाटत नाहीं. कारण शेक्स्पिअरच्या 'हॅम्लेट' अगर 'किंग लिअर' अगर 'टेम्पेस्ट' या नाटकांत शक्य व अशक्य वाटणाऱ्या घटनांचें चमत्कारिक मिश्रण आहे आणि त्यांची मनावर जबरदस्त पकड बसते. तेव्हां कलाकृति जर मनाला जाऊन भिडायची असेल, अगर ती खरी वाटायची असेल तर तिच्यांत शक्य वाटणाऱ्या घटनाच घडल्या पाहिजेत अशांतला भाग नाहीं. तिच्यांत अंतर्गत कलात्मक सुसंगति असली म्हणजे झालें. मात्र कधीं कधीं ही कलात्मक सुसंगति कलाकृतींत असण्याकरितां तींत घडणाऱ्या घटना शक्यतेच्या कोटींतल्या असाव्या लागतात. अशा वेळीं त्या तशा नसल्या तर मात्र कलाकृति खरी वाटत नाहीं.

वास्तवता हें एक कलात्मक मूल्य आहे असें मानलें म्हणजे हरि नारायण आपट्यांच्या कादंबऱ्यांत सदाशिव पेठेतील जीवनाचें चित्रण असतें म्हणून त्या संकुचित अगर हिणकस अशा स्वरूपाचे निष्कर्ष टीकाकार काढतात. पण कलाकृतींत जीवनाच्या कोणत्या आणि केवढ्या भागाचें चित्रण केलें आहे ह्यावर तिचें श्रेष्ठत्व अवलंबून नसतें. त्या कलाकृतींतून अनुभवाची जी संगति निर्माण केली आहे ती किती 'मोठी' आहे ह्यावरच त्या कलाकृतीचें मोठेपण अवलंबून असतें.

कलाकृतींत वास्तवता असावी ह्या भूमिकेचा आतांपर्यंत अनेक बाजूंनीं परामर्श घेतला व ती सदोष आहे असें दाखवून दिलें. कलाकृतींत व्यक्त होतो तो अनुभव. वास्तवता हें त्या अनुभवाचें निमित्त व कांहीं अंशीं कारण असतें. तेव्हां कलाकृतींत महत्त्व आहे तें अनुभवाच्या यथातथ्य चित्रणाला. वास्तवतेच्या चित्रणाला नव्हे !

---

## दिसा-दिसांच्या उचापतींचीं – !

— दिसा-दिसांच्या उचापतींचीं
मोहक स्वप्नें गुंफी रजनी
( प्रत्यक्षांतिल अनवगतांची
प्यास थंडते स्वप्नामधुनी ! )

स्वप्नांचीं हीं जीर्ण लक्तरें
वाळत दोरीवरी कधींचीं
निगूढ अंतर्मनांत आणि
कुजबुज ऐकूं सदा यायची

दिवसभरांतिल धर्मजाल हे
रात्रीं चमकत मोत्यावाणी
दिसांस मिळतो रात्रींच्या अन्
पोतडींतला दाणापाणी ...

हातामध्यें हात मिळवुनी
दिनरातींचीं चावट युग्में
शिंपित, शिल्पित पहा निघाली
प्रारब्धांतील खवचट बिंगें ...

— आणिक असल्या घाण्यामधुनी
सुख-दुःखांची पिकते पोळी
चिमणें जीवन वृथाच नटतें
फक्त जमवुनी कांहीं ओळी !

— मधुकर जावडेकर

# ' गोंडवनांतील प्रियंवदा ' : २ :

मागील लेखांकांत शारदाबाई-वैजनाथशास्त्री यांच्या विवाहाचें समाजशास्त्रीय रहस्य जाणून घेतल्यानंतर शारदाबाईंचीं सामाजिक प्रश्नांसंबंधींचीं मतें काय आहेत तें थोडक्यांत पाहूं. शारदाबाईंचें बिंबाबाई, प्रियंवदा आणि वैजनाथशास्त्री यांच्यांशीं वेळोवेळीं जें संभाषण झालें त्यांतून तीं मतें प्रकट झालेलीं आहेत. तीं सुसंगत स्वरूपांत आपण येथें संकलित करूं. स्त्रीशिक्षण, विधवांचें जीवन आणि सुधारकांची स्त्रियांच्या प्रश्नाकडे पाहण्याची शास्त्रदुष्ट वृत्ति, या विषयांवर प्रामुख्यानें तिनें मतप्रदर्शन केलेलें आहे. त्याची रूपरेषा खालीं दिल्याप्रमाणें आहे :

'' स्त्रियांना भावनांचें शिक्षण देणें अत्यंत आवश्यक आहे. त्यांच्या जीवनांत भावनाशिक्षणास प्राधान्य असल्यामुळें पत्नीत्वाचा आणि मातृत्वाचा अनुभव आल्याशिवाय स्त्रीच्या जीवनाची परिपूर्ति होऊं शकत नाहीं. म्हणूनच स्त्रीला कौमार्यापेक्षां वैधव्य चांगलें, असें म्हणणें असयुक्तिक होत नाहीं. वैधव्यांत एकदां पत्नीत्वाचा अनुभव येऊन गेलेला असल्यामुळें तें कौमार्यापेक्षां श्रेष्ठ तर असतेंच, पण त्याशिवाय विधवेचें हिताहित पाहणारीं एकाच वेळीं दोन घराणीं तिला लाभतात. आपल्या धर्मशास्त्रकारांनीं कुमारी आणि विधवा यांच्याविषयीं जो धर्म सांगितलेला आहे, तो स्त्रियांच्या मनाचा पूर्ण अभ्यास करून सांगितलेला नाहीं. मृत पतीचें आमरण नामस्मरण करून काल कंठणें आणि व्रतें, उपवास इत्यादि गोष्टी करून देहदंडन करणें, हा त्यांनीं विधवांकरितां धर्म सांगितलेला आहे; पण सर्वसाधारण विधवांना त्याचें पालन करणें कठीण आहे.

'' सुधारकांचीं पुनर्विवाहासंबंधींचीं मतें मुळींच मान्य होण्यासारखीं नाहींत; कारण तीं समाजाचा शास्त्रीय अभ्यास करून तयार केलेलीं नाहींत. सुधारक म्हणविणारे लोक वृत्तीनें अत्यंत असहिष्णु आहेत. ते आपल्या बायकांस आपलीं धर्मविषयक मतें पाळण्याचें स्वातंत्र्य देत नाहींत. हे स्त्रीस्वातंत्र्याचे चाहते सुधारणेच्या नांवाखालीं बायकांवर जुलुम करतात. ' आमची आजची नामर्द सुधारक मंडळी आपलीं तत्त्वें बायकांवर लादून त्यांचा खून करण्यास कमी करीत नाहींत. ' ''

मौजेची गोष्ट ही कीं सुधारकांवर असहिष्णुतेचा आरोप करणाऱ्या शारदाबाई सुधारकांचें नांव काढतांच संतप्त होतात. सुधारकांचा उल्लेख होतांच ' आमच्या शारदाबाई मास्तरीण ' डाकिनीची मुद्रा धारण करतात आणि ''एक चांगला नऊ वाद्यांचा कोरडा घ्यावा आणि त्या सुधारणावादी पत्रकाराची चांबडी लोंबवावी'', ''सर्व सुधारक पत्रकार घ्यावेत आणि एका दोरीनें अगदीं जवळच्या झाडाच्या फांदीस टांगून फांशी द्यावेत'', अशी जहाल आणि अनुदार भाषा त्यांच्याबद्दल वापरतात. इंग्रज मिशनरी हे हिंदु पुरुषांत आणि बायकांत तेढ उत्पन्न करतात. हिंदु बायकांचे आपण पाठिराखे आहोंत अशी भावना त्यांच्या मनांत निर्माण करतात आणि ' सुधारक म्हणवून घेणाऱ्यांची जी एक टोळी उत्पन्न झाली आहे ' ती त्या इंग्रज मिशनऱ्यांच्या या हेतूस मदत करते — अशी सुधारकांविरुद्ध शारदाबाई तक्रार मांडतांना आढळतात.

शारदाबाई ही वैजनाथशास्त्र्यांची ' अज्ञातवासांत असलेली शिष्या. ' ती विधवा होती; तिला शिक्षिकेचा व्यवसाय असल्यामुळें ती आर्थिक दृष्ट्या स्वावलंबी होती. तरीहि आपल्या आयुष्याला हेतु नाहीं, याबद्दल तिला सदैव खंत वाटत होती. जें कार्य केल्याच्या योगानें आपल्या आयुष्याला निश्चित हेतु लाभेल असें कोणतें जीवितकार्य आपण निवडावें या प्रश्नानें तिला अस्वस्थ करून सोडलें होतें. तिच्या प्रश्नाची बैठक बरीच व्यापक होती. तिनें वैजनाथशास्त्र्यांस

' नवभारत 'च्या गेल्या जानेवारी १९५६ च्या अंकांत या निबंधाचा पूर्वार्ध येऊन गेला आहे. प्रस्तुत लेख उत्तरार्ध आहे.— का. सं.

विचारलें : " समाजशास्त्रवेत्ते म्हणतात कीं समाजाची उत्क्रांति होत असतांना त्या उत्क्रांतीस जोरानें चालना देणें हें समाजशास्त्रयुक्त कार्याचें ध्येय आहे. अर्थात् देशाभिमानानें ज कार्य व्हावयाचें तें समाजाची उत्क्रान्ति अधिक होण्यासाठींच होय. तर मग महाराज, आपल्या समाजाची उत्क्रान्ति कोणत्या दिशेनें होणार ? अर्थात् ज्या दिशेनें तो विकास होणार आहे, ती दिशा ओळखून त्या विकासांतील कांहींतरी कार्य साधल्यानेंच लोककल्याण होणार आहे. तर मग महाराज, मी आपणांस असें विचारतें कीं पुढं समाज कसा होणार आहे, व त्यासाठीं आज काय करावें, आपण आपल्या आयुष्याचा सद्व्यय कसा करावा ? "

वैजनाथशास्त्र्यांशीं विवाहबद्ध झाल्यानंतरच खरोखर शारदाबाईंना आपल्या प्रश्नांचें समाधानकारक उत्तर मिळालें, त्यांच्या आयुष्याला निश्चित हेतु प्राप्त झाला. पण त्यापूर्वीं त्या दोघांत आधीं जी चर्चा झाली आणि त्या चर्चेतून वैजनाथशास्त्र्यांनीं तिला जें जीवनविषयक तत्त्वज्ञान सांगितलें तें तिच्या लग्नाचें समर्थन करणारेंच ठरलें. वैजनाथशास्त्र्यांनीं प्रतिपादिलेल्या जीवनदृष्टीचा मुख्य आशय, त्यांतील आवश्यक तपशीलासह पण थोडक्यांत मांडावयाचा असेल तर तो असा मांडतां येईल : "पूर्वीं आपल्या समाजांत चातुर्वर्ण्याची पद्धति अत्यंत प्रभावी स्वरूपांत प्रचलित होती. प्रत्येक व्यक्ति आपल्या वर्णाच्या वांट्यास आलेलें कर्तव्यकर्म निमूटपणें, त्याच्या इष्टानिष्टतेची वा युक्तायुक्ततेची चिकित्सा न करतां, पार पाडीत असे आणि तसें करण्यांत आपलें जीवन सार्थकीं लागलें असें समजत असे. आजहि तोच वर्णधर्म आपण पाळला पाहिजे. प्रत्येक मनुष्य चातुर्वर्ण्यांतील कोणत्यातरी वर्णाचें कार्य करीत असतो. त्यानें आपल्या वर्णाचें नियोजित कर्तव्य अव्यभिचारी निष्ठेनें तडीस नेलें पाहिजे. स्त्रियांना सुद्धां हाच वर्णधर्म लागू आहे. स्त्री चातुर्वर्ण्यांतील ज्या वर्णांत समाविष्ट झालेली असेल त्या वर्णाचें आणि त्याबरोबर त्या वर्गाच्या स्त्रीचें कर्तव्यकर्म तिला पार पाडलें पाहिजे. ब्राह्मणवर्गाची स्त्री असली तर ब्राह्मणवर्गाचें कार्य करण्यास पुरुषास समर्थ करणें हें ब्राह्मण नायकांचें काम. क्षत्रियवर्गाची स्त्री असेल तर प्रसंगीं राज्यरक्षणादि कामें करणें हें क्षत्रिय स्त्रीचें काम. वैधव्यदशेंतील स्त्रियांनीं आणि अविवाहित स्थितींतून ज्यांना सुटणें शक्य नाहीं अशा स्त्रियांनीं स्ववर्णानुरूप पुरुषांचेंच ध्येय ठेवावें. जर हें शक्य नसेल तर जो मनुष्य अगर जी स्त्री ज्ञानार्जनाच्या पाठीमागें लागली असेल त्यांचें आयुष्य सुखकर करून त्यांना अधिक कार्य करण्यास समर्थ करावें.

" स्त्रियांनीं आणि पुरुषांनीं कोणतीं कामें करावीं यासंबंधीं निर्णय घेतांना स्त्री आणि पुरुष यांच्या मानसिक शक्तींतील भेद लक्षांत घेतला पाहिजे. स्त्रियांचें केवळ बुद्धिगोचर बाबींपेक्षां इंद्रियगोचर बाबींकडे लक्ष अधिक दिसतें. भावात्मक सृष्टीकडे व सामान्य नियमांकडे पुरुष अधिक वेधला जातो आणि स्त्री ही द्रव्यात्मक ऊर्फ अधिक व्यक्त अशा सृष्टीकडे वेधली जाते. "

" प्रत्येक हिंदु पुरुषानें आणि स्त्रीनें जगाच्या विकासक्रमाकडे लक्ष देऊन आपलें ध्येय ठरविलें पाहिजे. जगाची प्रवृत्ति कोणत्या दिशेनें होत आहे, विशिष्ट तऱ्हेनें जगाचा भावी इतिहास बनविण्याची हिंदु मनुष्यास कितपत शक्यता आहे, आपल्या इच्छेप्रमाणें आणि आपणांस अनुकूल अशा प्रकारें भावी स्थिति आणणें शक्य असेल तर आज त्याच्यासाठीं काय करतां येईल, आणि त्यांतल्या त्यांत मला काय करतां येईल, या प्रकारचे प्रश्न विचारून प्रत्येक हिंदूनें आपलें जीवितकार्य निश्चित केलें पाहिजे. त्याचबरोबर, राष्ट्राची ऐहिक सुधारणा हाच खरा परमार्थ आहे, जें राष्ट्र शास्त्रविकासांत पुढें जाईल तेंच राष्ट्र खरें पराक्रमी राष्ट्र होऊं शकतें, हा महत्त्वाचा सिद्धान्तहि पण त्यानें सदैव ध्यानांत ठेवला पाहिजे. "

जगताचा विकासक्रम लक्षांत घेऊन हिंदूंनीं आपल्या आचारविचाराला योग्य तें वळण लावावें असें उदात्त तत्त्वज्ञान सांगणारे आणि " वैजनाथशास्त्री कांहीं मोठा विद्वान् नाहीं किंवा अलौकिक बुद्धिमत्तेचा मनुष्य नाहीं. तो मेहनत करणारा मनुष्य आहे एवढेंच", असें आपलें स्वतःचें आत्मकठोर वृत्तीनें वर्णन करणारे वैजनाथशास्त्री जेव्हां इतर हिंदूंचा अधिक्षेप करून फक्त कोंकणस्थ ब्राह्मणांबद्दलच अतिशयोक्त अभिमान व्यक्त करूं लागतात तेव्हां आपणांस सखेदाश्चर्य वाटूं लागतें. " जगाच्या विकासक्रमाकडे लक्ष देऊन आपल्या आयुष्याचें ध्येय ठरविण्याची बुद्धि ही कोंकणस्थ ब्राह्मणांत स्वभावतःच आहे. एकंदर देशाच्या वाईट

स्थितीबद्दल ब्राह्मणांस आणि विशेषेंकरून कोंकणस्थ ब्राह्मणांस जो दोष देण्यांत येतो त्यावरून एकच गोष्ट सिद्ध होते, ती ही कीं इतर सर्व जातींना आपल्या वाईट स्थितीबद्दल आपण स्वतः जबाबदार आहों असें वाटत नसून, देशाच्या बरेवाईटपणाची जबाबदारी कोंकणस्थ ब्राह्मणांवर आहे असें वाटतें. कारण देशांतले इतर लोक म्हणजे 'आहार-निद्रा-भय-मैथुनानां'पैकीं आहेत. देशाच्या पारतंत्र्याबद्दल ज्यांना कांहीं वाटतें असे कोंकणस्थांतच आहेत" अशी वैजनाथशास्त्र्यांची कोंकणस्थांबद्दलची भूमिका आहे. तींत कोंकणस्थांची प्रमाणाबाहेर गायिलेली महति आणि इतर हिंदूंबद्दल दाखविलेली तुच्छ वृत्ति ही एकंदर हिंदु समाजाच्या हिताबद्दलच्या त्यांच्या जागरूक वृत्तीशीं पूर्णपणें विसंगत आहे. त्यामुळें, " राज्य कोंकणस्थांचें गेलें आहे आणि तें पुन्हां त्यांनीं मिळविलें पाहिजे !" या त्यांच्या विधानावर जेव्हां शारदाबाई " राज्य कोंकणस्थांचें गेलें कीं हिंदूंचें गेलें ?" असा मार्मिक प्रश्न विचारतात तेव्हां त्यांना निरुत्तर व्हावें लागलें आहे !

असो. वैजनाथशास्त्र्यांचें हें तत्त्वज्ञान आपण ध्यानांत ठेवलें पाहिजे; कारण याच वैजनाथशास्त्र्यांची समाज-नियमनविषयक स्वतंत्र 'स्मृति' 'ब्राह्मणकन्या' या कादंबरींत ग्रथित करण्यांत आलेली आहे. त्या स्मृतींत मांडण्यांत आलेल्या विचारांत कांहीं विशेष क्रांति वा विकास दृष्टीस पडतो कीं काय हें ताडून पाहण्याच्या दृष्टीनें या कादंबरींतील त्यांच्या विचारांचा परिचय आपण कायम ठेवला पाहिजे. त्याचबरोबर, " विधवा स्त्रीनें, जो पुरुष ज्ञानार्जनाच्या पाठीमागें लागला असेल त्याचें आयुष्य सुखकर करून त्यास अधिक कार्य करण्यास समर्थ करावें" या सिद्धान्ताचा आश्रय घेऊन शारदाबाई-वैजनाथशास्त्री हे विवाहबद्ध झाले या घटनेवरीलहि आपलें लक्ष टिकून राहिलें पाहिजे. शारदाबाई आणि वैजनाथशास्त्री हे दोघेहि ब्राह्मण, दोघेहि विद्यार्जन करणारे, दोघेहि परस्पर सह-कार्याला उत्सुक असलेले, त्यामुळें शारदाबाई शास्त्री-बुवांच्या सहधर्मचारिणी बनण्यानें 'समसमां संयोग' जुळून आला, असेंच आपण म्हटलें पाहिजे !

जेथें असा 'समसमां संयोग' जुळून येत नाहीं, स्त्री आणि पुरुष यांच्या सामाजिक दर्ज्यांत आणि नैतिक कल्पनांत संवाद नांदत नाहीं असे विषम विवाह सुख-कर होत नाहींत, हें दाखविण्याकरितां डॉ. केतकरांनीं या कादंबरींत शशिपाद-आयडा हें प्रेमविवाहाकरितां उत्सुक झालेलें जोडपें आणलेलें आहे. शशिपाद लाहा हा लंडन येथें बॅरिस्टरीचा अभ्यास करणारा एक बंगाली विद्यार्थी आहे; इंग्रज चांभाराची मुलगी असलेली आयडा ही त्याची प्रेयसी आहे. तो हिंदु आणि ती इंग्रज असल्यामुळें दोघांचे नैतिक आदर्श भिन्न आहेत, दोघांच्या श्रद्धेचीं स्थानें भिन्न आहेत. लोकमतहि अशा विवाहाला अनुकूल राहण्याची शक्यता अगदींच कमी आहे. केवळ प्रेम हें त्या दोघांचें वैवा-हिक जीवन सुखी करण्यास असमर्थ आहे. म्हणूनच शशिपादबरोबरच लंडन येथें बॅरिस्टरीचा अभ्यास करणारा रामभाऊ गोडबोले यानें त्याला जो उपदेश केला तो आपणांस सहज पटण्यासारखा आहे; राम-भाऊनें शशिपादला सांगितलें: "वैवाहिक संबंध कायम राहावा म्हणून स्त्रीपुरुषांना अनेक प्रकारचें शिक्षण दिलें जातें. पातिव्रत्यधर्म, एकपत्नीव्रत इत्यादि धर्म-तत्त्वें शिकविलीं जातात. तुझी परंपरागत उपदेशावर श्रद्धा नाहीं, तुझ्या आयडाचीहि नाहीं, आणि तुझ्या आयडास तूं आपल्याकडील धर्माची आणि संस्कृतीची गोडी उत्पन्न करून दिली नाहींस त्यामुळें ज्या कल्पना तुला आदरणीय होऊन, त्यांचें तुम्हां दोघांवर वजन पडून तुम्हां दोघांस नीतिमार्गांत ठेवतील अशा कल्पना देखील तुमच्यापाशीं नाहींत. लग्न झालें तरी नवराबायकोस एकत्र जोडून ठेवण्यास प्रेमाशिवाय अनेक गोष्टी लागतात. एक तर त्यांस होणारीं मुलें, दुसरें नीतिकल्पना आणि तिसरें लोकमत." रामभाऊं-च्या उपदेशाचा मथितार्थ हाच कीं लग्न यशस्वी होण्याकरितां एकूण चार गोष्टी जुळून याव्यास पाहिजेत : (१) लग्न झालेल्या स्त्रीपुरुषांत प्रेम पाहिजे; आधीं जडलेल्या प्रेमाचीच स्वाभाविक परिणति त्या लग्नांत झालेली असली पाहिजे; (२) त्या दोघांना कायमचें जवळ आणण्याइतका जिव्हाळा उत्पन्न करण्यासाठीं संततीचें बंधन पाहिजे; (३) दोघांचे नैतिक आदर्श एकरूप पाहिजेत आणि (४) सर्वसाधारण जनमत त्यांच्या विवाहाला अनुकूल असलें पाहिजे.

यशस्वी विवाहासंबंधींच्या या विचारसरणीशीं बर्ट्रंड रसेलची या विषयासंबंधींची विचारसरणी बरीच








जुळणारी आहे. त्यानें आपल्या ' Marriage and Morals ' या ग्रंथांत यशस्वी विवाहाच्या आवश्यक गोष्टींचा विचार करतांना म्हटलें आहे कीं, " आपण दोघेंहि सारख्याच दर्जाचे आहोंत अशी दोघांत भावना असावी, एकानें दुसऱ्याच्या स्वातंत्र्यांत व्यत्यय आणण्याची प्रवृत्ति नसावी, शारीरिक आणि मानसिक दृष्ट्या दोघे एकमेकांच्या अगदीं जवळ असावेत आणि दोघांच्याहि मूल्यांत कांहीं प्रमाणांत सारखेपणा असावा. " ( " There must be a feeling of complete equality on both sides; there must be no interference with mutual freedom; there must be the most complete physical and mental intimacy and there must be a certain similarity in regard to standards of values ". रामभाऊनें म्हणजेच पर्यायानें डॉ. केतकरांनीं यशस्वी विवाहाच्या ज्या चार अटी सांगितल्या आहेत त्यांपैकीं प्रेम आणि मूल्यसंवाद या दोन अटी रसेलच्या वरील उताऱ्यात आलेल्या आहेत. तिसऱ्या संततीच्या अटीचा उल्लेखहि, त्याचा वरील उतारा त्याच्या उपर्युक्त ग्रंथाच्या ज्या प्रकरणांतून घेतलेला आहे त्याच प्रकरणांत त्यानें केलेला आहे. त्यानें लिहिलें आहे कीं, " ज्या विवाहाचा प्रारंभ भावगर्भ प्रेमानें झालेला आहे आणि ज्यामुळें वांछिलेल्या व प्रेमविषय बनलेल्या संततीचा लाभ झालेला आहे अशा विवाहामुळें विवाहित स्त्री-पुरुषांत अत्यंत उत्कट स्वरूपाचा प्रीतिबंध उत्पन्न व्हावयास पाहिजे. इतका उत्कट कीं, त्या बंधामुळें, आपला परस्परसहवास हा अत्यंत मौल्यवान् आहे असें दोघांस वाटूं लागतें; लैंगिक वासनेला उतरती कळा लागल्यानंतरहि, एवढेंच नव्हे तर त्या दोघांपैकीं एकाला किंवा दोघांनाहि तिसऱ्याच कोणाबद्दल लैंगिक आकर्षण वाटूं लागलें तरीहि तो सहवासांतला जिव्हाळा कायमच राहतो. " ( " A marriage, which begins with passionate love and leads to children who are desired and loved, ought to produce so deep a tie between a man and woman that they will feel something infinitely precious in their companionship, even after sexual passion has decayed, and even if either or both feel sexual passion for someone else." ) विवाहाच्या सफलतेची सांगता होण्यासाठीं त्याला लोकमताच्या अनुकूलतेचें जें अधिष्ठान असावें लागतें त्याचा रसेलनें विचार केलेला दिसत नाहीं. खरें पाहिलें असतां, विवाहित नवदंपतीचें समाजाकडून भरल्या तोंडानें कौतुक व्हावयास पाहिजे, अंतःकरणपूर्वक अभिनंदन व्हावयास पाहिजे. समाजाकडे पाठ करून बसण्यानें, समाजावर रुसून राहण्यानें व्यक्तींना सुखी जीवन व्यतीत करतां येत नाहीं; व्यष्टि आणि समष्टि यांच्यांत संवाद उत्पन्न झाल्याशिवाय व्यक्तीच्या जीवनाची नौका सुखानें मार्गक्रमण करूं शकत नाहीं, हें महान् तत्त्व लक्षांत घेऊन विवाहाच्या यशस्वितेकरितां डॉ. केतकरांनीं जी लोकमताची अट घातलेली आहे, तिची आत्यंतिक आवश्यकता आपणांस पटूं लागते.

या कादंबरींतले आपण आतांपर्यंत चित्रा-हरिभय्या, शारदा वैजनाथ आणि लाहा-आयडा असे तीन विवाह पाहिले. या विवाहांच्या रूपानें आपणांस अनुक्रमें, विवाहापूर्वी अनुनय झाला पाहिजे, सार्वजनिक कार्यकर्त्यांच्या पोषणाची जबाबदारी त्यांच्याशीं लग्न करून कमावत्या सुशिक्षित स्त्रियांनीं सांभाळली पाहिजे आणि विवाहाच्या पूर्ततेकरितां केवळ प्रेम पुरेसें नसून त्याला संतति, नैतिक मूल्यांतील संवाद आणि लोकमान्यता यांची जोड मिळाली पाहिजे – या समाजशास्त्रीय तत्त्वांचीं प्रात्यक्षिकेंच पाहावयास मिळालीं. त्या तत्त्वांचे दाखले देण्याकरितांच हे विवाह घडवून आणले असें म्हटलें असतां चालेल.

या कादंबरींत प्रियंवदा व रामभाऊ गोडबोले यांचा आणखी एक विवाह दाखविलेला आहे. या विवाहाच्या निमित्तानें फक्त विवाहोत्तर अनुनयाचाच तेवढा सक्रिय पुरस्कार दाखविलेला आहे; बाकी प्रियंवदेच्या मुखांतून स्त्रीजीवनासंबंधीं आणि स्त्रीपुरुषसंबंधाविषयीं जीं अत्यंत क्रांतिकारक मतें मांडलेलीं आहेत त्यांचा साक्षात् आविष्कार रतिमात्र स्वरूपांत सुद्धां आपणांस प्रियंवदेच्या जीवनांत पाहावयास मिळत नाहीं; एवढेंच नव्हे तर ज्या क्रांतिकारक तत्त्वांचें ती उत्तान अभि-








निवेशानें समर्थन करते तीं सारीं तत्त्वें, तिचा प्रिय पति रामभाऊ गोडबोले इंग्लंडमधून बॅरिस्टर होऊन परत आल्यावर, ती सोईस्करपणें विसरून जाते आणि आपल्या मुलाबाळांच्या संकुचित संसारांत पूर्णपणें रमून जाते.

कोणाहि वाचकाला प्रिय वाटावें इतकें प्रियंवदेचें व्यक्तित्व विलोभनीय आहे. अनेक आकर्षक गुण-विशेषांचा तिच्या ठिकाणीं सुंदर समन्वय साधलेला आहे. ती आदर्श प्रेयसी आहे, आदर्श गृहिणी आहे आणि आदर्श माताहि आहे. जेव्हां ती स्त्रीजीवनाच्या माहात्म्याचें वर्णन करून अनिर्बंध स्त्रीस्वातंत्र्याचा कैवार घेते तेव्हां तिच्या ओजस्वी वाणींतून प्रकट होणारा ऊर्जस्वल ध्येयवाद आपणांस अक्षरशः थक्क करून सोडील, अशा स्वरूपाचा आहे. तिच्या मूळच्याच प्रभावशाली असलेल्या पतिनिष्ठेला हृदयंगम आणि निरागस रसिकतेची साथ मिळालेली आहे. रामभाऊ गोडबोलेशीं तिचा झालेला विवाह हा प्रौढविवाह आहे. तिच्या विवाहांत विवाहपूर्व अनुनयाचा मात्र पूर्ण अभाव आहे. तिचा विवाहोत्तर अनुनयावर दृढ विश्वास आहे. तिचा विवाहानंतरचा खेळकर आणि निरामय अनुनय अत्यंत आल्हाददायक आहे. डॉ. केतकरांनीं तिचें वर्णन करतांना लिहिलें आहे : " प्रियंवदाबाई नवऱ्यास पाहून दूर पळणारी नव्हती.
' गूढा नूपुरशब्दमात्रमपि मे कांता श्रुतौ पातयेत् ।
पश्चादेत्य शनैः करांबुजवृते कुर्वीत वा लोचने ॥ '
याप्रकारें नवऱ्याचें कोड पुरविणारी प्रियंवदा होती. लहानपणच्या खेळगड्याशीं खेळावें त्याप्रमाणें ही नवऱ्यापाशीं खेळे. भीत भीत दूर पळणाऱ्या बायकोस एकटी पाहून तिच्याकडे हरभरे फेंकून मारण्याचें कारण रामभाऊस पडलें नाहीं. उलट, नवरा अभ्यास करीत असतां संत्र्याचीं सालें त्याच्या अंगावर फेंकून लपून बसण्याचें तीच स्वतः करी; आणि जगन्नाथरायाच्या 'शृंगारविलासां'तील अगर भर्तृहरीच्या 'शृंगारशतकां'तील मौजेचे श्लोक घेऊन त्यांचा अर्थ काय म्हणून नवऱ्यास विचारावयास जावयाची देखील तिला शंका वाटत नसे. " पत्नीनें आपलें आकर्षकत्व वाढवून पतीला सदैव वश करून ठेवावें असें ती शारदाबाईला सांगतांना आढळते. " स्त्रीनें पुरुषाची सहचरी होणें आणि त्याला आपण मोहक होऊं असें बनणें हा पत्नीचा हक्क आहे. " असें तिला वाटतें. " स्त्रियांनीं आपलें आकर्षकत्व वाढविण्यासाठीं कांहींच प्रयत्न केला नाहीं तर नवरे बाहेर हिंडायला लागतात " अशी तिला साधार भीति वाटते. ती विचारते, " जर एखादी बाई पोषाखांत ठाकठिकी करूं लागली, नवऱ्याला प्रिय होईल अशा गोष्टी करण्यांतच पुढाकार घेऊं लागली, नवऱ्याची सहचरी होण्यांतच आनंद मानूं लागली तर ती नायकिणीसारखी आहे असें लोकांनीं कां म्हणावें ? पुरुषांचें मनोरंजन करणें, सुंदर वस्त्र-विभूषित होणें या सर्व गोष्टींचा वेश्यांनाच मक्ता आहे काय ? ". " प्रजोत्पादनार्थ विवाहित स्त्रिया आणि मनोविनोदनार्थ वेश्या " अशी वृत्ति समाजांत वावरत असल्यामुळें वेश्यांची संस्था कायम राहते, हें तिचें मत अगदीं सयुक्तिक वाटतें. विवाहोत्तर अनुनयामुळेंच वैवाहिक जीवनाची माधुरी कायम टिकूं शकते, त्याच्या अभावीं पतिपत्नीसंबंधांत विसंवादाची भीति उत्पन्न होते, हें प्रियंवदेचें म्हणजे डॉ. केतकरांचें मत बर्ट्रंड रसेलनेंहि पुरस्कारलेलें आढळून येतें. तो म्हणतो कीं, " लग्नानंतरसुद्धां प्रियाराधनेची जरूर असते हें पुष्कळ पुरुषांच्या लक्षांत येत नाहीं; आणि पतीपासून मनानें आणि शरीरानें दूर राहण्यानें आपण आपलें विवाहबंधन कसें खिळखिळें करून सोडतों याची पुष्कळशा सुसंस्कृत स्त्रियांना जाणीव राहात नाहीं. " (" Most men do not realize that a process of wooing is necessary after marriage and many well-brought-up women do not realize what harm they do to marriage by remaining reserved and physically aloof. ")

प्रियंवदा ही ' प्रेमाची भाष्यकार ' आहे. प्रेमाचें पावित्र्य ती पूर्णपणें जाणून आहे. विवाहपूर्व अनुनया-चा तिला स्वतःला अनुभव नसला तरी तें तिला पूर्ण-पणें मान्य आहे. " स्त्रियांनीं लगट करून पुरुषाला आपल्या जाळ्यांत ओढणें " हें गैर नाहीं असें तिचें मत आहे. शक्य असेल त्या साधनांनीं आपल्याला आवडलेल्या पुरुषाजवळ प्रेमाची अभिव्यक्ति अवश्य करावी हें तत्त्व शारदाबाईंना समजावून देतांना ती सांगत आहे– " जर पुरुषांविषयीं स्त्रीच्या मनांत प्रेम उत्पन्न झालें असलें आणि स्त्रीला जरी तें शब्दांनीं








व्यक्त करणें लोकरीतीच्या दृष्टीनें अयोग्य असलें तरी तीच गोष्ट अनेक क्रियांनीं व्यक्त करणें स्त्रीचें कर्तव्य आहे." "नवरा उपयुक्त कामांत गुंतला असतां बायकोनें काम करून दोघांचेंहि पोट भरण्यास तयार व्हावें", यांत कुटुंबाला कोणत्याहि प्रकारें कमीपणा येत नाहीं असें तिचें सांगणें आहे. त्यामुळेंच तर शिक्षिकेचें काम करून द्रव्यार्जन करणाऱ्या शारदाबाईंना पोटाचा व्यवसाय न करणाऱ्या पण इतिहास-संशोधनाच्या महत्त्वाच्या उद्योगांत रमलेल्या वैजनाथशास्त्र्यांशीं विवाह करण्याचा – तोहि अनुनयपूर्वक करण्याचा – सल्ला दिलेला आहे. आम्हीं पूर्वींच सांगितल्याप्रमाणें या सल्ल्यांत मातृसत्ताक कुटुंबपद्धतीच्या पुरस्काराचा अस्पष्ट ध्वनि उमटलेला आहे. स्त्रीला समाजांत पुरुषाच्या बरोबरीनें हक्क मिळाले पाहिजेत, या तिच्या मतांतील आग्रहानें अत्यंत उग्र आणि आक्रमक रूप धारण केलें आहे. तिनें स्त्रीवर्गाला अत्यंत स्फूर्तिदायक संदेश दिलेला आहे. तिचें सांगणें आहे : " जगांतल्या पुरुषी धर्मशास्त्रीय कल्पना स्त्रियांनीं झुगारून दिल्या पाहिजेत. आतां बायकांनीं आपलें स्वतंत्र धर्मशास्त्र आपल्या इच्छेनेंच तयार करण्याची वेळ आलेली आहे. यापुढें लग्नें खरोखर पुरुषांच्या इच्छेनें न होतां बायकांच्या इच्छेनें ठरलीं पाहिजेत आणि यासाठीं पुरुषांनीं 'प्रपोझ' करण्याची वाट पाहण्यापेक्षां बायकांच्यातर्फे वर-संशोधनाची पद्धति रूढ होणें आवश्यक आहे. " या संदेशानुरूप पुरुषांच्या बरोबरीनें स्त्रियांना समाजांत स्थान मिळण्यावर प्रियंवदेचें समाधान होणें अशक्य आहे. ती याहि पुढें जाऊन, एकंदर राष्ट्ररक्षणांत स्त्रीचें महत्त्व किती आहे हें सांगतांना म्हणते : " राष्ट्र म्हणजे बायका, पुरुष नव्हे. राष्ट्ररक्षण म्हणजे बायकांचें रक्षण, पुरुषांचें रक्षण नव्हे. राष्ट्रांतले पुरुष नाहींसे झाले तरी थोडक्या पुरुषांच्या साहाय्यानें अनेकपत्नीपद्धति सुरू करून किंवा बायकी भाषेंत बोलावयाचें झाल्यास सामुच्चयिक पतिपद्धति सुरू करून एका पिढींत पुन्हां राष्ट्र गजबजवितां येईल; पण राष्ट्रांतल्या बायकाच नाहींशा झाल्या म्हणजे राष्ट्र गेलेंच. यासाठीं राष्ट्रांतल्या स्त्रीवर्गानें समाजसंरक्षण हें आपलें कर्तव्य म्हणून स्वीकारलें पाहिजे. पुरुष हें धर्मशास्त्राचे प्रश्न सोडविण्यास अगदीं नालायक आहेत आणि याचें मुख्य कारण ते पुरुष आहेत हें होय. एखाद्या जमिनीचा विशिष्ट बी पेरण्याकडे उपयोग करावा कीं करूं नये हें ज्याप्रमाणें जमिनीच्या मालकानें ठरवावयाचें असतें, बियांच्या व्यापाऱ्यानें ठरवावयाचें नसतें त्याप्रमाणें प्रजोत्पादनाचा प्रश्न केवळ स्त्रियांनीं आपल्या इच्छेनें सोडवावा. विवाह आणि प्रजोत्पादन यांविषयीं झालेले सर्व पुरुषी नियम व्यर्थ आहेत. राष्ट्राचें रक्षण होणें किंवा राष्ट्र नष्ट होणें ही गोष्ट स्त्रीसंख्येवर अवलंबून आहे, पुरुष-संख्येवर नाहीं; आणि राष्ट्ररक्षण, जातिरक्षण इत्यादि गोष्टींस जर अधिक महत्त्व असेल तर प्रजोत्पादन ज्या स्त्रियांना करावें लागणार त्यांना नीतिनियमांनीं बद्ध करण्याचा अधिकार पुरुषास पोंचतच नाहीं. राष्ट्राची लोकसंख्या वाढविण्याची शक्ति स्त्रीसंख्येवर व त्यांच्या विवाहित स्थितीवर अवलंबून राहणार. तर ज्या पुरुषांचें राष्ट्रसंख्या-वर्धनांतील कार्य अप्रधान आहे त्यांनीं नीतिनियम उत्पन्न करावेत हा कोण न्याय ?" राष्ट्रांतील पुरुष नाहींसे झाल्यावर तें पुन्हा गजबजून सोडण्याकरितां स्त्रियांना पुरुषाचें साहाय्य घ्यावें लागणार नाहीं का ? प्रजोत्पादन स्त्रियांना करावें लागणार असलें तरी पुरुषांच्या सहकार्याशिवाय त्यांना तें शक्य होईल का ? म्हणून स्त्रीपुरुषसंबंधाचे नियम, दोघांच्याहि अडचणी आणि सोयी लक्षांत घेऊन तयार व्हावयास नकोत काय ? – असे उलट प्रश्न विचारून प्रियंवदाबाईंना कोंडींत पकडणें कांहीं विशेष कठिण नाहीं. पण आम्ही आमच्या उदार अंतःकरणावरील स्त्रीदाक्षिण्याचे संस्कार नाहींसे होऊं द्यावयास राजी नाहीं. स्त्रीपुरुषसंबंधविषयक नीतिनियमांच्या निर्मितींत पुरुषप्राधान्याचा– नव्हे, पुरुषपक्षपातित्वाचा सुद्धां अतिरेक झालेला आहे हें खरें आहे; त्यामुळें चिडून जाऊन प्रियंवदाबाईंनीं सर्वस्वीं स्त्रीप्रधान– नव्हे, स्त्रीपक्षपाती– नीतिनियमांचा पुरस्कार करणें अगदीं स्वाभाविक आहे. प्रियंवदेच्या स्त्रीपक्षपातित्वानें अखेरीस कोणती सीमा गांठलेली आहे हें पाहण्याच्या दृष्टीनें तिचें पुढील क्रांतिकारक विधान विशेष मननीय आहे. ती शारदाबाईला सांगत आहे : " स्त्रियांनीं लग्न न लावतां प्रजोत्पत्ति करण्यास सुरुवात केली तरी ती गोष्ट तत्त्वतः चूक नाहीं असें मी म्हणेन. लग्न म्हणजे काय, तर अपत्याची जबाबदारी पुरुषावर टाकण्याची पद्धति." स्त्री जर आर्थिक दृष्ट्या










स्वावलंबी झाली आणि आपल्या मुलांचें पालनपोषण आपली आपणच करूं शकली तर मग तिनें विवाहाचें बंधन स्वीकारून पुरुषाच्या गुलामगिरींत खितपत कां पडावें ? वाटेल त्या पुरुषाबरोबर रममाण होऊन वाटेल तेव्हां संतति उत्पन्न करण्याचा आपला हक्क प्रस्थापित करण्यास स्त्रियांनीं कां कचरावें ? – असा प्रियंवदेचा रोखठोक आणि करडा सवाल आहे. मातृसत्ताक कुटुंबपद्धतीच्या पुरस्काराची तिची ही कल्पना आज अत्यंत पुरोगामी ( आणि म्हणूनच कांहींना प्रियहि ) वाटण्यासारखी आहे. तिची ही कल्पना म्हणजे तिच्या समाजशास्त्रीय विचारांनीं अनिर्बंध अंतराळांत घेतलेलें एक उंच उड्डाण आहे. त्याच्या दर्शनानें कित्येक वाचक चकित आणि भयभीत होण्याचा संभव आहे. तिच्या या विचारांत पुरुषपक्षपाती नीतिनियमांच्या विरुद्ध अगदीं स्वाभाविक पण अत्यंत जबरदस्त अशी प्रतिक्रिया प्रकट झालेली आहे हें लक्षांत घेतलें म्हणजे मग तिच्या विचारांच्या भयावहत्वाचा बाऊ करणें व्यर्थ आहे. प्रियंवदा म्हणते त्याप्रमाणें राष्ट्र म्हणजे केवळ स्त्रिया नव्हत; किंवा स्त्रीला दास्यांत डांबणारे पुरुष म्हणत असतील तर त्यांच्या म्हणण्याप्रमाणें राष्ट्र म्हणजे केवळ पुरुषहि नव्हत. राष्ट्रांत केवळ स्त्रीचें प्राबल्य नको किंवा केवळ पुरुषांचें प्राबल्य नको; राष्ट्रांत स्त्रीपुरुषांचें समंजस साहचर्य निरंतर नांदावयास पाहिजे. नीतिनियम तयार करतांना ते केवळ स्त्रीसापेक्ष किंवा पुरुषसापेक्ष न ठेवतां, ते स्त्रीपुरुषसहकारसापेक्ष राहतील याबद्दल दक्षता बाळगली पाहिजे. समाधानाची गोष्ट ही कीं तिचा पति इंग्लंडहून नागपुरास परत येऊन बॅरिस्टरी करूं लागल्यावर प्रियंवदेनें आपलीं स्त्रीजीवनासंबंधीचीं एकांतिक, आक्रमक आणि असहिष्णु मतें सोडून दिलेलीं आहेत, स्त्रीपुरुष-संबंधांतील समंजस साहचर्याची सयुक्तिकता तिला पूर्णपणें पटलेली आहे. डॉ. केतकरांनीं तिच्याबद्दल लिहिलें आहे : "प्रियंवदा स्त्रीस्वातंत्र्य, स्त्रियांचे हक्क, पुरुषी धर्मशास्त्र इत्यादि विषयांवर बोलण्यास अजिबात विसरून गेली. ती इतकी कीं तिचीं मतें काय होतीं याचीहि पुढें लोकांना आठवण नाहींशी झाली; आणि ती सार्वजनिक आयुष्यक्रमांत पुढें कधींच आली नाहीं. ". असो.

डॉ. केतकरांनीं बिंबा-हरिभय्या, शारदा-वैजनाथ, शशिपाद-आयडा आणि प्रियंवदा-रामभाऊ या चार विवाहांच्या माध्यमांतून या कादंबरींत खालील महत्त्वाचे समाजशास्त्रीय मुद्दे मांडलेले आहेत :

१. ब्राह्मणांनीं पुरस्कार आणि अंगीकार केलेला नसल्यामुळें हिंदुसमाजांत विवाहपूर्व अनुनय-पद्धति आढळत नाहीं. कोठें कोठें प्रौढविवाहहि प्रचलित असून स्त्रियांस बरेंच स्वातंत्र्यहि आहे; तेथेंहि अनुनयाचा अभाव आहे.

२. आधीं अनुनय, मग विवाह अशी लग्नपद्धति रूढ झाली पाहिजे. विधवांच्या विवाहाची आर्थिक जबाबदारी उचलण्याची त्यांच्या पालकांची तयारी नसल्यामुळें तर पुनर्विवाहांत अनुनय विशेषेंकरून आवश्यक आहे.

३. आर्थिक स्थैर्याकरितां किंवा कामवासनेची शारीरिक गरज भागविण्याकरितां किंवा पापावर पांघरूण घालण्याकरितां पुनर्विवाह न होतां तो प्रेमामुळें आणि प्रेमाकरितां झाला पाहिजे.

४. अनुनयोत्तर विवाहाच्या सफलतेला पोषक आणि प्रोत्साहक होईल असें वातावरण निर्माण करणाऱ्या संस्था संचालित केल्या पाहिजेत.

५. अनुनय केवळ बोलका किंवा लिखित नको; तो क्रियाशील पाहिजे.

६. अनुनयाची परिणति विवाहांत झालीच पाहिजे. अनुनय करून मग विवाहास नकार देऊन फसविणाऱ्या पुरुषास कायद्यानें शिक्षा झाली पाहिजे.

७. सुधारक हे सुधारणेचे शत्रू आहेत : ( १ ) ते पुनर्विवाहाचा पुरस्कार करतात; पण ते घडून येण्याकरितां आवश्यक असलेल्या अनुनयोत्तेजक व अनुनय-सहायक संस्था उत्पन्न करीत नाहींत. ( २ ) ते आधींच बिघडलेल्या किंवा स्वतः बिघडविलेल्या विधवांचें धरून-बांधून उभ्या केलेल्या पुरुषांशीं लग्न लावून देतात. ( ३ ) ते परप्रत्ययनेयबुद्धि आहेत; कारण ते सुधारणेच्या बाबतींत इंग्रजांच्या व मिशनऱ्यांच्या चालीनें चालतात. ( ४ ) त्यांनीं समाजाचा शास्त्रीय अभ्यास केलेला नाहीं.

८. वेळेच्या अभावीं पोटाचा व्यवसाय करूं न शकणाऱ्या ध्येयवाद्यांशीं कमावत्या सुशिक्षित विधवांनीं लग्न करावें आणि त्यांस गृहसौख्याचा लाभ करून देऊन आपलें कार्य प्रसन्न चित्तानें पार पाडण्यास लागणारें मनःस्वास्थ्य त्यांस मिळवून द्यावें.










९. विवाहानंतरहि अनुनय अत्यंत आवश्यक आहे. कारण विवाहोत्तर अनुनयाच्या अभावीं, प्रजोत्पादनासाठीं पत्नी आणि मनोविनोदनार्थ वेश्या अशी वृत्ति पुरुषांत बळावण्याचा संभव असतो.

१०. विवाहाच्या यशस्वितेला केवळ प्रेमच पुरेसें नसून संततीचें बंधन, पतिपत्नींच्या नैतिक मूल्यांत संवाद आणि लोकानुकूलतेचें अधिष्ठान याहि गोष्टींची जोड मिळाली पाहिजे.

११. पत्नीत्वाचा आणि मातृत्वाचा अनुभव घेतल्याशिवाय स्त्रीच्या जीवनाची पूर्तता होऊं शकत नाहीं.

१२. आजचे स्त्रीपुरुषसंबंधविषयक नीतिनियम हे पुरुषपक्षपाती आहेत. त्यामुळें स्त्रियांना होणारा अन्याय दूर केला पाहिजे; एवढेंच नव्हें तर राष्ट्ररक्षणांतील स्त्रीचें महत्त्व ओळखणारे नवे नीतिनियम तयार करण्यांत आले पाहिजेत.

१३. पुरुषाची गुलामगिरी न पत्करतां स्त्रीला प्रजोत्पादन करण्याचा हक्क मिळाला पाहिजे.

१४. जगताचा विकासक्रम लक्षांत घेऊन हिंदूंनीं आपलें जीवितकार्य निश्चित केलें पाहिजे.

१५. राष्ट्राची ऐहिक सुधारणा हाच खरा परमार्थ आहे हें हिंदूंनीं ओळखलें पाहिजे. जें राष्ट्र शास्त्रविकासांत पुढें जातें तेंच राष्ट्र पराक्रमी बनतें हें तत्त्व सदैव ध्यानांत ठेवलें पाहिजे.

## टिळक-महाराष्ट्र-विद्यापीठाचें भारतीय धर्म-तत्त्वज्ञान-संस्कृति-मंडळ

पुणें येथील टिळक महाराष्ट्र विद्यापीठानें एक ' भारतीय धर्म-तत्त्वज्ञान-संस्कृतिमंडळ ' स्थापन केलें असून त्या मंडळाचें उद्घाटन १ जानेवारी १९५६ रोजीं श्री. हरिभाऊ फाटक यांच्या अध्यक्षत्वाखालीं झालें. या भा. ध. त. सं. मंडळाचें संचालक **आचार्य वि. प्र. लिमये** यांनीं त्या प्रसंगीं या संस्थेबाबत जें निवेदन केलें त्यांतून पुढील भाग उद्धृत केला आहे :

" टिळक महाराष्ट्र विद्यापीठ गेलीं ३५ वर्षें राष्ट्रीय शिक्षणाचें काम करीत आहे. " सा विद्या या विमुक्तये " या न्यायानें हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यासाठीं जे जे सत्याग्रह झाले त्यांत विद्यापीठाचे आचार्य व शिष्य यांनीं प्रत्यक्ष भाग घेतला. त्याचवेळीं ज्ञानदान, विद्येची उपासना, शिक्षणशास्त्रांतील नवे नवे प्रयोग, वैदिक वाङ्मय-प्रकाशन इत्यादि कामें चालूं होतीं. स्वातंत्र्य-प्राप्तीनंतर जुन्या शास्त्रीय परंपरेनुसार वेदान्त, व्याकरण, न्याय, साहित्य इत्यादि शास्त्रांचें शिक्षण देण्यासाठीं विद्यापीठानें संस्कृत महाविद्यालयाची स्थापना करून गेलीं आठ वर्षें सदर काम चालूं ठेवलें आहे. आतां हें नवीन " भारतीय-धर्म-तत्त्वज्ञान संस्कृतिमंडळ" स्थापन करण्याचें विद्यापीठानें ठरविलें आहे. बुद्धापासून ते विनोबापर्यंत ज्या महापुरुषांनीं भारताचा इतिहास घडविला व जे आज घडवीत आहेत अशांच्या जीवनाचा व तत्त्वज्ञानाचा संशोधनपूर्वक अभ्यास करून धर्म, तत्त्वज्ञान व संस्कृति – एतद्विषयक ग्रंथ प्रसिद्ध करणें व तीं तत्त्वें जीवनांत बाणविण्याचा प्रयत्न करणें, हा प्रधान उद्देश मंडळानें आपणांपुढें ठेविला आहे. या मंडळावर पुढील मंडळींनीं काम करण्यास मान्यता दिली आहे; आणखी कांहींची मान्यता अद्याप यावयाची आहे:- ( १ ) महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार ( अध्यक्ष ), ( २ ) श्री. शंकरराव देव, ( ३ ) श्री. भाऊसाहेब हिरे, ( ४ ) श्री. जयंतराव टिळक, ( ५ ) प्रि. सोनोपंत दांडेकर, ( ६ ) डॉ. सौ. इरावती कर्वे, ( ७ ) प्रा. रं. द. वाडेकर, ( ८ ) श्री. बाबूराव जगताप, ( ९ ) आचार्य स. ज. भागवत, ( १० ) आचार्य वि. प्र. लिमये ( संचालक ), ( ११ ) डॉ. बा. चिं. लागू ( खजिनदार ), ( १२ ) श्री. द. कृ. गोसावी व ( १३ ) श्री. चिं. ग. काशीकर संयुक्त चिटणीस.

" येत्या २३ जुलैला लो. टिळकांचा जन्मशताब्दि-महोत्सव अखिल भारतीय स्वरूपांत साजरा व्हावयाचा आहे. त्या प्रसंगीं, भा. ध. त. सं. मंडळांत **लो. टिळक विद्यास्थान** (Department of Study) सुरू होईल. तसेंच २ ऑक्टोबरला **महात्मा गांधी विद्यास्थान** ( Department of Study ) सुरू होईल. टिळक पर्स फंड, गांधी स्मारक निधि यांचेकडून आर्थिक साहाय्याचें अभिवचन मिळालें आहे. या महोत्सवाच्या प्रसंगानें विद्यापीठानें आपल्या नव्याजुन्या कार्यास सुस्थिरता आणण्यासाठीं दहा लाख रुपयांचा निधि जमविणेंचे ठरविलें आहे. स्वतंत्र इमारत बांधण्याकरितां सहा एकर जागाहि टि. म. वि. को-ऑ. हाउसिंग सोसायटीनें देण्याचें ठरविलें आहे. विद्यापीठांतील जुन्या कार्यकर्त्यांनीं जरी हा उपक्रम सुरू केला असला तरी विद्वान्, उत्साही, होतकरू तरुण मंडळींवर हें काम सोंपवावयाचें आहे. या कामीं सर्वांनीं सहकार्य करावें. "








श्री. म. पु. शारंगपाणि

# सामाजिक मानसशास्त्र

सामाजिक मानसशास्त्र, मानसशास्त्राची एक शाखा असून या विषयाच्या अभ्यासाला विशेष महत्त्व प्राप्त झालें आहे. मानसशास्त्राला शास्त्रीयतेचें स्वरूप गेल्याच शतकांत आलें असलें तरी त्याची वाढ फार झपाट्यानें होत आहे. ज्याप्रमाणें सामाजिक मानसशास्त्राचा अंतर्भाव मानसशास्त्रांत होतो; तद्वतच मानसशास्त्रहि मानववंश-शास्त्रांत ( Anthropology ) समाविष्ट झालेलें आहे. मानसशास्त्रांत व्यक्तीच्या मनाचा व वर्तनाचा विचार स्वतंत्रपणें केला जातो आणि सामाजिक मानस-शास्त्रांत व्यक्ति हा समाजघटक असल्यानें समाज व व्यक्ति यांमधील परस्पर संबंधाचा तौलनिक दृष्ट्या विचार करण्यांत येतो. व्यक्ति समाजांत कशी वावरते, व्यक्तीवर समाजाचें कोणतें नियंत्रण असतें, व्यक्तीच्या आशा व आकांक्षा समाजप्रेरित कशा असतात, निर-निराळया व्यक्ती सहकार्य कसें व कां करतात आणि त्यांच्यांत संघर्ष कां निर्माण होतो या सर्व महत्त्वाच्या प्रश्नांची चर्चा सामाजिक मानसशास्त्रांत केली जाते. व्यक्तीचें समाजाच्या चौकटींतील वर्तन हा ह्या शास्त्राचा प्रतिपाद्य विषय आहे. आणि तदंगभूत असलेल्या इतर सर्व प्रश्नांचा ऊहापोह करून व्यक्तीच्या कृतींचें सामाजिक दृष्ट्या निरीक्षण केलें जातें. सामाजिक मानसशास्त्राच्या अभ्यासकाला सामान्य मानसशास्त्राची माहिती असणें आवश्यक आहे. कारण व्यक्तिगत मानसशास्त्राचे नियम सामाजिक मानस-शास्त्रालाहि आधारभूत आहेत. प्रो. ऑलपोर्ट यांनीं सामाजिक मानसशास्त्रावर लिहिलेल्या ग्रंथाचा प्रस्ताव करतांना हें शास्त्र व्यक्तिगत मानसशास्त्रावर आधारलें आहे, हें विसरून चालणार नाहीं, असें स्पष्टपणें सांगितलें आहे. व्यक्तीमध्यें असलेल्या उपजत प्रेरणा व त्यांचें कार्य सामाजिक मानसशास्त्रांत प्रकट होत असल्यानें त्या विषयींची माहिती सामाजिक मानस-वेत्त्याला असणें जरूर आहे.

## समाजप्रियतेची प्रेरणा

सर्वसामान्यतः ज्या चौदा उपजत प्रेरणा मानल्या जातात त्यांपैकीं समाजप्रियतेच्या प्रेरणे-( Gregarious instinct ) ला सामाजिक मानसशास्त्रांत विशेष महत्त्व दिलें जातें. डॉ. ट्रॉटर यांनीं " दि हर्ड इन्स्टिक्ट " या ग्रंथामध्यें युद्धें कां उद्भवतात याचें सविस्तर विवेचन सामाजिक मानसशास्त्राच्या आधारानें केलेलें आहे. मनुष्य समाजप्रिय प्राणी आहे. ह्या सत्य तत्त्वाची पुनरुक्ति करणें आवश्यक नसलें तरीहि समाजप्रियतेच्या प्रेरणेचा अजूनहि सांगोपांग अभ्यास झाला नाहीं हें निर्विवाद आहे. कांहीं एकांतवासप्रिय प्राणी सोडून दिले असतां बहुतेक इतर सर्व प्राण्यांमध्यें समाजप्रियतेची प्रेरणा कमी अधिक प्रमाणांत दिसून येते. उत्क्रांति-सोपानावर ज्या ज्या प्राण्यांनीं वरची पायरी गांठली आहे, त्या सर्व प्राण्यांत समाजप्रियतेची प्रेरणा अधिक तीव्र स्वरूपांत आढळून येते आणि एकांतवासप्रिय प्राण्यामध्येंहि ही प्रेरणा अगदींच लुप्तप्राय झालेली असते असें नाहीं. वाघ, सिंह आणि कॅनडामधील मऊ केसांचीं कांहीं जनावरें एकांतवासप्रिय असतात. तथापि त्या प्राण्यांमध्येंहि कांहीं काळ जमावानें रहाण्याची पद्धति आहे, ह्यांत शंका नाहीं. माकडें, मुंग्या आणि मधमाशा यांच्यामध्यें समाजप्रियतेच्या प्रेरणेचा फार मोठ्या प्रमाणांत परिपोष झाला आहे असें म्हटलें पाहिजे. श्रमविभाग आणि कार्यवैशिष्ट्य या बाबतींत तर मुंग्या आणि मधमाशा मनुष्यजातीलाहि खालीं पहावयास लावतील. रानांत जे प्राणी कळप करून रहातात त्या सर्वांना जमावांत राहिल्यामुळें दोन फायदे होत असतात. अन्नसंशोधनार्थ त्यांना सहकारिता स्वीकारावी लागत असून स्वसंरक्षणाच्या दृष्टीनेंहि जमावांत रहाणें फायद्याचें असतें. कळप सोडून किंचित् बाजूला चरत असलेल्या हत्तीला सिंहाचा सुगावा लागल्यास








भीतीनें तो चीत्कार करूं लागतो आणि त्यामुळें इतर हत्तींमध्येंहि भीतीची भावना प्रादुर्भूत होऊन ते पळूं लागतात. दक्षिण महासागरांत दक्षिण ध्रुवाजवळ रहात असलेल्या पेन्ग्विन पक्ष्यामध्यें श्रम-विभागानें रहाण्याच्या पद्धतीचा अवलंब केल्याचें निरीक्षकास आढळून आलें आहे. पेन्ग्विन पक्षी आपलीं घरटीं किनाऱ्यावर बांधतात. तेव्हां प्रत्येकाच्या घरट्याची मर्यादा आंखून दिलेली असते. एका पक्ष्याच्या घरट्यांत दुसरा बळजबरीनें शिरूं लागल्यास इतर पक्षी त्याचा प्रतिकार करण्यास धांवून जातात. हे पक्षी मासे पकडण्यासाठीं समुद्रावर जातात तेव्हां ते आपलीं लहान पिलें जमातींतील निर्बल आणि वृद्ध पक्ष्यांच्या स्वाधीन करतात. आणि मागे उरलेले पक्षी या लहान पिलांचें संरक्षण करून त्यांच्या जीवितक्रमाला उपयुक्त ठरेल असें शिक्षण देतात व त्याचा मोबदला म्हणून ह्या वृद्ध पक्ष्यांना इतर पेन्ग्विन्स्‌कडून उदर-निर्वाहासाठीं मासे मिळतात.

मनुष्यप्राण्यांत केवळ प्रेरणेनेंच कार्य चालत असतें तर तो इतक्या उच्च उत्क्रान्तावस्थेला जाऊन पोंचला नसता. प्रेरणांच्या विशिष्ट कार्यप्रवणतेंत बदल करून त्यांना योग्य दिशा देण्याइतकी बुद्धि मनुष्याजवळ असल्यानें तो प्रगतिपथाचा बराच पल्ला गांठूं शकला.

### जमावाचें मानस

जमावांमध्यें व्यक्तीच्या मानसिक प्रतिक्रिया वेगळया दिसून येत असतात. ज्या वेळीं भीतीचा किंवा संतापाचा आवेग जोराचा असतो, त्या वेळीं दोन प्रकारच्या प्रतिक्रिया मनुष्यांतहि आढळून येतात. एखाद्या नाटक-गृहाला आग लागली असें समजतांच एखाद्या माणसाच्या चेहऱ्यावर भीतीची भावना व्यक्त होते व तोंडांतून भीतीचा उद्गारहि बाहेर पडतो. भीतीनें ग्रासलेली ह्या माणसाची मुद्रा पहातांच दुसऱ्या माणसाच्या मनांतहि त्याच भावनेचा आविष्कार होऊन तो पहातांच तिसऱ्या माणसाच्या मनांतहि तीच भावना निर्माण होते. अशा प्रकारच्या प्रतिक्रियेला समान्तर प्रतिक्रिया ( parallel re-action ) असें सामाजिक मानसशास्त्रांत नांव आहे. पहिल्या माणसाचा भीतिग्रस्त चेहरा पहातांच दुसऱ्या माणसाच्या चेहऱ्यावर भीतीची भावना प्रतिबिंबित होते आणि पहिला माणूस दुसऱ्याच्या मुद्रेवरील ही प्रतिबिंबित भीति-भावना पहातो आणि त्याला अगोदरच वाटत असलेली भीति प्रतिक्रियेनें दुणावते. अशा तऱ्हेच्या प्रतिक्रियेला मंडल-प्रतिक्रिया ( circular re-action ) हें नांव सामाजिक मानसशास्त्रानें दिलेलें आहे. लोकांचा जमाव थोडा काळपर्यंत टिकणारा असल्यास त्या जमावाची वागणूकहि एका ठराविक पद्धतीची असते. या जमावांतील व्यक्ती निरनिराळया वयाच्या आणि वेगवेगळया स्वभावाच्या असल्या तरी त्यांच्या कृतींत एकवाक्यता येऊन असंस्कृत रीतीनें या व्यक्ती वागूं लागतात. प्रत्येकाच्या मनावर झालेले उच्च संस्कार दुर्बल होऊन त्यांच्यामध्यें असलेल्या पाशवी शक्तीला ऊत येतो आणि भावनेच्या भरांत लोकांचा जमाव अयोग्य रीतीनें वागूं लागतो. सुशिक्षित अमेरिकन लोकांच्या जमावाकडून एखाद्या निरपराध नीग्रोचा पाठलाग केला जाऊन त्याचा प्राण घेतला जातो, हें पाहिल्यास जमावाच्या कृती एका ठराविक नियमानुसार चालतात असें सिद्ध होतें. उच्च भावनांचा लोप आणि पाशवी इच्छेची जागृति यामुळें जमावाची वागणूक निकृष्ट दर्ज्याची ठरते. ज्या नियमानें हें वर्तन घडून येतें, त्याला ' संयुक्ति व नियंत्रणाचा नियम ' ( 'Law of fusion & arrest' ) असें नांव आहे.

### ' अंतःसमूह ' व ' बहिःसमूह '

सामाजिक मानसशास्त्रामध्यें समाजाचे दोन विभाग कल्पिलेले आहेत. त्यांपैकीं पहिल्या विभागाला अंतःसमूह, दुसऱ्या विभागाला बाह्यसमूह (In-group & out-group ) असें म्हणतात. सर्वांत लहान अंतःसमूह कुटुंब असून सर्वांत मोठा अंतःसमूह राष्ट्र होय. इतर राष्ट्रांतील लोक बाह्यसमूहांत जमा होतात. कुटुंबसंस्था हा अंतःसमूहाचा अत्यंत महत्त्वाचा प्रकार असल्यामुळें त्याचा विशेष अभ्यास सामाजिक मानसशास्त्रांत केलेला आहे. मूल उपजतांच तें कुटुंबसंस्थेंतील घटक बनतें आणि कुटुंबांत मिळालेल्या शिक्षणामुळेंच बाह्य जगांत पदार्पण करण्याची त्याला कुवत येते. कुटुंबांत रहाणाऱ्या लहान मुलाच्या मनावर जे संस्कार होतात त्यावरच त्याच्या पुढील जीवनांतील आशा आणि आकांक्षा अवलंबून असतात. एखाद्या भटक्या रानटी टोळींत शिकारीला महत्त्व आलेलें असल्यास











त्या टोळींतील लहान मुलें आपण उत्तम शिकारी बनूं अशी आकांक्षा बाळगतात आणि तदनुषंगानें त्यांचे कसून प्रयत्न चालूं असतात. जपानी कुटुंबांतील मुलगे असतील त्यांना जपानचा बादशहा मिकॅडो-बद्दल आदर बाळगण्यास शिकवितात आणि तो ईश्वरी अंश असल्याचें सत्य त्यांच्या मनावर ठसविलें जातें. स्वतःला इजा झाली असतां ती सहन केली पाहिजे आणि आपल्या हातून लांछनास्पद कृत्य घडून वांट्याला अपयश आलें तर प्राणार्पण केलें पाहिजें अशी शिकवण उच्च जपानी कुटुंबांतील मुलांना दिली जात असल्यानें 'हाराकिरी'चा प्रघात जपान-मध्यें शतकानुशतकें चालू होता. अमेरिकन् कुटुंबांतील मुलांना परस्परविरोधी अशा तत्त्वानुसार घरांत शिक्षण देण्यांत येतें. बायबलमधील तत्त्वांबद्दल श्रद्धा बाळगून ती त्यांच्या मनांत चिंबावी म्हणून शक्य तेवढे प्रयत्न केले जातात. उंटाला सुईच्या नेढयांतून जातां येईल पण श्रीमंत मनुष्याला स्वर्गांत प्रवेश मिळूं शकणार नाहीं अशीं बायबलमधील वचनें प्रत्यहीं त्यांच्या कानीं पडतात. याउलट, अमेरिकन् कुटुंब-संस्थेंत यश व पैसा या खेरीज दुसरें कांहींच मानार्ह मानिलें जात नाहीं. बायबलमधील धर्मतत्त्वें आणि व्यावहारिक तत्त्वें यांमध्यें ओढाताण होऊन अमेरिकन् माणसाचें व्यक्तित्व द्वंद्वमय ( Schizoid personality ) बनतें, असें किंबॉल यंग यांनीं प्रतिपादन केलें आहे. अशाच प्रकारचें स्वभावद्वंद्व आजच्या भारतीय लोकांत सांपडेल. कारण भारतीय संस्कृतीची सांस्कृतिक शिकवण परमार्थिकतेच्या दृष्टीनें दिली जाते आणि ऐहिक सुखाकडे बऱ्याच अंशीं दुर्लक्ष करण्यांत येतें. पाश्चात्त्य संस्कृति ऐहिक-सुखाच्या दृष्टीनेंच विचार करीत असल्यामुळें आणि त्या संस्कृतीचा आपल्या प्राचीन संस्कृतीवर बराच परिणाम घडून आलेला असल्यामुळें आपल्या जुन्या चालीरीतींत व वागणुकींत फेर पडलेला आहे. ह्या दोन्ही संस्कृतींचा योग्य पद्धतीनें संगम घडवून आणून स्वभावांतील द्वंद्व नाहींसें करण्यासाठीं सामाजिक मानसशास्त्राचा अभ्यास करणें उपेक्षणीय ठरणार नाहीं.

### सहकार्य आणि स्पर्धा

समाजामध्यें मुख्यतः सहकार्य आणि संघर्ष अशीं दोन परस्परविरोधीं तत्त्वें दिसून येतात. अंतःसमूहा-चा कुटुंब हा एक घटक घेतला तरी त्यावरून सहकार्य आणि संघर्ष सातत्यानें कसे चालूं राहतात हें कळून येईल. कुटुंबांतील भावंडें एकमेकांना मदत करतात तर त्या उलट, आईबापांची आपल्यावर अधिक मर्जी बसावी म्हणून त्यांच्यामध्यें संघर्ष निर्माण होतो. निरनिराळे व्यापारी आपला संघ स्थापन करितात आणि सहकार्यानें व एकजुटीनें व्यापाराची अभिवृद्धि व्हावी एतदर्थ सरकारकडे मागणी करतात. परंतु ह्या व्यापारांत आपापसांमध्यें स्पर्धा चालू असल्यामुळें संघर्ष निर्माण होतो. सामाजिक मानसशास्त्राचा अभ्यास केल्यांने सहकार्याच्या आणि संघर्षाच्या मर्यादा व क्षेत्र ठरविणें अधिक सुकर जातें. संयुक्त राष्ट्रसंघ जें कार्य करीत आहे किंवा ज्या ध्ययप्राप्ती-साठीं त्याचे प्रयत्न चालूं आहेत त्या सर्वांतील आदि-तत्त्वें म्हणजे सहकारिता आणि स्पर्धा-संघर्ष होय. सामाजिक मानसशास्त्राचा अभ्यास करून त्यांतील योग्य वाटणाऱ्या तत्त्वांचा स्वीकार केल्यास आंतर-राष्ट्रीय प्रश्नहि सोडविण्यास थोडीफार मदत होईल. राष्ट्राराष्ट्रांमध्यें बंधुभाव उत्पन्न करणें, वर्णद्वेष, धर्मद्वेष व जातिद्वेष यांचे निर्मूलन करणें हें ध्येय साधावयाचें, याचाच अर्थ सर्व जागतिक समाज अंतःसमूह माना-वयाचा. यासाठीं निरनिराळया राष्ट्रांतील लोकांच्या स्वभावाचा अभ्यास तौलनिक रीतीनें करण्याचा बराच-सा प्रयत्न सामाजिक मानसवेत्त्यांनीं केलेला आहे.

आधुनिक यांत्रिक संस्कृतीच्या युगांत लोकमत बनविण्यासाठीं प्रचाराचा हरतऱ्हेनें उपयोग केला जात असून, नेहमींच्या व्यवहारांतील बहुतेक सर्व क्षेत्रें प्रचारानें व्यापिलीं आहेत. प्रचार हें एक शास्त्र बनून त्याचा अभ्यास केला जातो. एवढेंच नव्हे तर कांहीं कांहीं विद्यापीठांतून प्रचार-पुस्तकें कशीं लिहावीं, त्यांत कोणचीं व कशा रंगाचीं चित्रें असावींत आणि कोणत्या आकर्षक वाक्यांचा उपयोग करावा वगैरे गोष्टींचें विद्यार्थ्यांना शिक्षण दिलें जातें. वर्तमानपत्रें, व्याख्यानें व रेडिओ यांच्या द्वारें प्रचारा-चें कार्य सरकारकडून किंवा लोकनेत्यांकडून अव्याहत चालूं असतें. लोकांचीं मनें प्रचारानें कां वळतात व त्यांच्या मनावर इष्टानिष्ट परिणाम कां घडून येतात याची कारणमीमांसा सामाजिक मानसशास्त्रांत केलेली



अनुक्रमणिका






असते. मनुष्याचें मन सूचनाग्रहण करण्यांत तत्पर असतें आणि सूचनाग्रहण केल्यानंतर तदनुरोधानें वागण्याचा यत्न मनुष्य करीत असतो. एका विद्यापीठांतील विद्यार्थ्यांना एकच ध्वनिमुद्रिका एकदां सावकाश व एकदां द्रुतगतीनें ग्रामोफोनवर वाजवून दाखविण्यांत आली. वाजविलेलीं गाणीं निरनिराळीं आहेत असें विद्यार्थ्यांना सुचविलें गेलें असल्यानें फारच थोड्या विद्यार्थ्यांना गाणीं भिन्न नसून एकच गाणें वाजविलें गेल हें कळूं शकलें. असत्य गोष्ट वारंवार आणि ठांसून सांगितली असतां ती सत्य बनते असें हिट्लर नेहमीं म्हणत असे. त्यांतील इंगित हेंच कीं, सामान्य लोक सूचनाग्रहण करण्यांत फारच तत्पर असतात. जनतेच्या ठायीं असलेल्या या सूचनाग्रहणशक्तीचा दुरुपयोग न करतां सदुपयोग कसा करून घ्यावा हेंहि आपणाला सामाजिक मानसशास्त्रापासून शिकतां येण्यासारखें आहे.

## बहिर्मुख वृत्ति आणि अन्तर्मुख वृत्ति

सामाजिक मानसशास्त्रामध्यें मनुष्यांच्या स्वभावाला अनुसरून वर्गीकरण केलेलें असतें. निरनिराळया मानसवेत्त्यांनीं निरनिराळया वर्गीकरणाच्या पद्धती सुचविल्या आहेत. त्यांपैकीं युंग यांची वर्गीकरणपद्धति सर्वसाधारणतः मान्य झालेली आहे. युंग हे शरीराच्या ठेवणीकडे विशेष लक्ष देत नाहींत म्हणून त्यांनीं स्थूलशरीर (pyknik), कृशशरीर (aesthetic) आणि मध्यमशरीर (Athletic) असे तीन वर्ग पाडलेले नाहींत. त्यांच्या मतें स्वभावाचे एकंदर मोठे असे तीन वर्ग पडतात. ज्या लोकांचें लक्ष बाह्य जगांतील गोष्टी आणि व्यवहार यांकडे असतें अशा लोकांचा एक वर्ग होतो आणि युंग यांनीं अशा वर्गाला (extrovert) बहिर्मुख दृष्टि असलेल्या लोकांचा वर्ग असें नांव दिलेलें आहे. बहिर्मुख वृत्ति असलेल्या लोकांत व्यापारी, संस्थांचे संचालक आणि सर्वांच्यांत मिळूनमिसळून वागणारे आनंदी लोक येतात. युंग यांनीं मानलेला दुसरा वर्ग अंतर्मुख दृष्टि असलेल्या (introvert) लोकांचा. यांचें लक्ष बाह्य विश्वाकडे नसून मनोविश्वाकडे असतें आणि ते आपल्याच विचारांत नेहमीं मग्न असतात. अशा लोकांना इतरांमध्यें सहज मिसळतां येत नाहीं आणि तसें करणें भाग पडलेंच तर तें मूकताच स्वीकारून शक्य तितका अलिप्तपणा अंगीकारतात. युंग यांच्या मतें कवि व तत्त्वज्ञ हे या वर्गांत सामान्यतः अंतर्भूत होतात. शेक्स्पियरच्या सुप्रसिद्ध 'हॅम्लेट' या शोकपर्यवसायी नाटकाचा नायक डेन्मार्कचा राजपुत्र हॅम्लेट हा अंतर्मुख दृष्टीचा असल्यानें त्याला स्वतःच्या जीवनांतील दुर्धर प्रसंग टाळतां आले नाहींत. कांहीं लोक पूर्णपणें अंतर्मुख वृत्तीचे किंवा बहिर्मुख वृत्तीचे नसून या दोन टोंकांमध्यें समतोल वृत्तीनें रहातात. अशी समतोल वृत्ति ठेवणाऱ्या लोकांना युंग यांनीं 'Ambiverts' हें नांव सुचविलें आहे. इतक्या समतोल दृष्टीचे लोक फारच विरळा. कारण बहुतेक सर्व अंतर्मुख किंवा बहिर्मुख वृत्तीकडे कमीअधिक प्रमाणांत वळलेले आढळतात (bimodal distribution). या वर्गीकरणाच्या अभ्यासाचा उपयोग एखाद्या राष्ट्रांतील लोकांचे गुणविशेष आणि स्वभावदोष शोधून काढण्यांत केला जातो आणि त्यामुळें राष्ट्रस्वभाव कसा आहे याचें ज्ञान प्राप्त होतें.

सामाजिक मानसशास्त्रांत लोकनेते किती प्रकारचे असतात व त्यांच्या अंगीं कोणते गुणदोष असूं शकतात, यांचें विवेचन केलेलें असतें. राष्ट्रांत क्रांति होण्यापूर्वी लेखनद्वारां बराच प्रचार केला जातो. क्रांतिपूर्वकालांतील पुढारी रूसो, व्हाल्टेयर आणि दिदेरो यांच्याप्रमाणें प्रगल्भ बुद्धीचे असावे लागतात. अशा तऱ्हेच्या पुढाऱ्यांचें प्रत्यक्ष लोकसमाजापुढें तेज पडत नसल्यानें लोकांचें मन वळविण्याला जे वेगळया तऱ्हेचे पुढारी लागतात त्यांना चळवळये (Agitators) हें नांव देतां येईल. या चळवळयांचें कार्य समाजांत जागृति घडवून आणणें आणि चालू राज्यसंस्थेविरुद्ध संताप व उद्वेग उत्पन्न करणें हें असतें. क्रांति यशस्वी होण्यासाठीं आणि चालू राज्याची घडी मोडण्यासाठीं नेपोलियनसारखे बहिर्मुख वृत्तीचे परंतु कर्तबगार लोकनेते लागतात. क्रांति यशस्वी रीतीनें पार पडल्यावर नवीन राज्ययंत्र सुरळीत चालण्यासाठीं वेगळया प्रकारच्या लोकधुरीणांची आवश्यकता असते. अशा तऱ्हेचे पुढारी पूर्णपणें बहिर्मुख किंवा अंतर्मुख वृत्तीचे नसून, समतोल बुद्धीनें वागून जनहित साधण्याचा कळकळीनें यत्न करणारे असतात. याखेरीज लोकांमध्यें निरर्थक द्वेषाचा फैलाव करून इतरांवर हुकुमत गाजवून स्वतःची तुंबडी भरूं पहाणारे (Boss) 'दादा' असतात. त्यांच्यावर सरकारला नियंत्रण

[ पुढील मजकूर पान २३ वर पहावा. ]










श्री. वि. ज. सहस्रबुद्धे

# छन्दःशास्त्रांतील गृहीत कृत्य

मराठी छन्दःशास्त्र किंवा मराठी पद्यरचनाशास्त्र, असा शब्दप्रयोग केला जातो. यांतील 'शास्त्र' हा शब्द फार महत्त्वाचा आहे. व्यवहार हा सहज वृत्तीनेंच जरी होत असतो तरी तो सुश्लिष्ट होणें, सोपपत्तिक होणें किंवा त्या व्यवहारामध्यें नियमितपणा येऊन कांहीं शिस्त, सौंदर्य निर्माण करणें हें कार्य शास्त्रग्रंथाचें आहे. शास्त्राचें विवेचन करण्याची पद्धत अशी कीं, आधीं दाखले द्यावयाचे, उदाहरणें द्यावयाचीं, आणि मग त्या उदाहरणांवरून कोणता सामान्य सिद्धान्त कसा निघतो तें सांगावयाचें. छन्दःशास्त्राची उभारणी अशाच रीतीनें झाली असली पाहिजे. कोणत्याहि शास्त्रांत कांहीं मूलभूत वस्तू अथवा मूलभूत तत्त्वें असतात. आणि कांहीं गृहीतकृत्यें असतात. या दृष्टीनें छन्दः-शास्त्राकडे पाहिलें तर असें दिसून येईल कीं, पद्यांत विशिष्ट तऱ्हेची शब्दरचना असते. शब्द हे एक अगर अनेक अक्षरांचे बनलेले असतात. तेव्हां अक्षरें हीं छन्दःशास्त्रांतील मूलभूत वस्तु किंवा तत्त्व समजतां येईल. आणि अक्षरांच्या उच्चाराबाबत जो संकेत, तो गृहीतकृत्य होय. अक्षरांचे दोन प्रकार : एक ऱ्हस्व; व दुसरा दीर्घ. अकारान्त, इकारान्त, उकारान्त, ऋकारान्त हीं ऱ्हस्व अक्षरें व बाकीचीं दीर्घ अक्षरें होत. ऱ्हस्व अक्षराला लघु व दीर्घ अक्षराला गुरु अशा संज्ञा छन्दःशास्त्रांत दिलेल्या आहेत. ऱ्हस्वदीर्घ हे उच्चार-सापेक्ष भेद आहेत व लघु-गुरु हे उच्चार-काल-सापेक्ष भेद आहेत. असा या दोन जोड्यांतील तात्त्विक फरक आहे. अनुस्वार-युक्त अथवा विसर्ग-युक्त ऱ्हस्व अक्षर गुरु समजलें जातें, तसेंच पुढें जोडाक्षर येऊन त्याचा जोर पडत असल्यास मागील ऱ्हस्व अक्षर गुरु समजलें जातें. आणि लघूची एक मात्रा व गुरूच्या दोन मात्रा मोजल्या जातात.

याप्रमाणें ही सर्वसामान्य माहिती येथें दिली आहे. आतां मला जो प्रश्न चर्चेकरितां पुढें ठेवावयाचा आहे, तो हा. : मराठी छन्दःशास्त्रांत अक्षरांच्या उच्चाराबाबत कोणता संकेत गृहीत धरावयास पाहिजे ? व जो संकेत गृहीत धरावयाचा, तो सर्व प्रकारच्या पद्य-रचनेस सारखाच लागूं करावयाचा किंवा कसें ? प्राचीन संस्कृत छन्दःशास्त्रकारांनीं याबाबतींत काय ठरविलें आहे ? हा प्रश्न उत्पन्न होण्याचें कारण असें आहे कीं, कै. प्रा. माधवराव पटवर्धन यांनीं ' छन्दोरचना'ग्रंथांत अक्षरोच्चाराच्या बाबतींत एकच नियम गृहीत धरलेला नाहीं. त्यांनीं पद्यरचनेचे तीन प्रकार दिले आहेत : वृत्त, जाति व छन्द. यांपैकीं वृत्तें व जाति या स्वरूपाच्या पद्यरचनेंत ऱ्हस्व अक्षराचा उच्चार ऱ्हस्व, आणि दीर्घ अक्षराचा उच्चार दीर्घ करावयाचा, ही गोष्ट मान्य केली असून छन्दाच्या बाबतींत मात्र स्वतंत्रच नियम माधवराव यांनीं सांगितला आहे. तो म्हणजे छन्दांत सारीं अक्षरें सारख्या काळांत उच्चारा-वयाचीं, छन्दांत प्रत्येक अक्षर द्विमात्रिक असतें. तें दिसायला लघु असलें तरी गुरु उच्चारावयाचें आणि गुरुच समजावयाचें ( 'छन्दोरचना', पान २०।५१२ पहा ). परंतु शंका येते कीं, अशा प्रकारचा नियम संस्कृत छन्दःशास्त्रांत अगर प्राकृत पिंगलांत नाहीं आणि हिंदी छन्दःशास्त्रांतहि नाहीं. प्राकृत पिंगलांत व हिंदी छन्दःशास्त्रामध्यें उच्चाराबाबत कांहीं अपवाद सांगितले आहेत. 'एकारान्त' व 'ओकारान्त' अक्षरें केव्हां केव्हां दीर्घ उच्चारलीं जात नाहींत. तेव्हां त्यांस लघु समजण्यांत येतें. परंतु हा अपवादसुद्धां अमुक एका विशिष्ट पद्यप्रकारासच लागूं आहे असें गृहीत धरलेलें नाहीं. हा अपवाद असल्यानें तो एक प्रकारें छन्दोदोषच समजला पाहिजे; परंतु तो दोष क्षम्य आहे, इतकेंच फार तर ठरेल.

मला मुख्य आक्षेप हा घ्यावयाचा आहे कीं, छन्दापुरता जो स्वतंत्र नियम माधवराव पटवर्धन सांगतात तो मान्य करतां येत नाहीं. कारण, हा शोध माधवराव यांनींच अलीकडे नवीन लावलेला आहे असें स्पष्ट म्हणणें भाग आहे. अभंग, ओवी वगैरे










छन्दांतील सर्व अक्षरें सारखीं दीर्घ उच्चारणें शक्य नाहीं, अस्वाभाविक आहे. 'मराठी छन्द' या पुस्तकांत कै. इतिहासाचार्य राजवाडे यांनीं अभंग, ओवी, घनाक्षरी वगैरे मराठी छन्दांबद्दल पुष्कळच ऊहापोह केला आहे. परंतु माधवराव पटवर्धन यांचा वरील नियम राजवाडे यांना माहीत नव्हता. राजवाडे यांनीं ऱ्हस्वाचा उच्चार ऱ्हस्व व दीर्घाचा उच्चार दीर्घच करावयाचा, हें गृहीत धरूनच अभंगाचे व ओवीचे प्रकार दाखविले आहेत. वृत्तदर्पणकार कै. परशुरामपन्त-तात्या गोडबोले यांनीं सुद्धां माधवराव यांचा वरील नियम गृहीत धरलेला नाहीं. अभंग, ओवी वगैरे प्रकारची पद्यरचना अलीकडे नवीच होऊं लागली आहे अशी वस्तुस्थिति नाहीं. ज्ञानेश्वरादिकांपासून अभंग, ओवी वगैरे छन्दःप्रकारांची रचना अनेक शतकें होत आली आहे. तेव्हां माधवराव यांचा वरील सिद्धान्त विचित्र व अस्वाभाविक ठरतो. अभंग, ओवी वगैरे प्रकारच्या कवितेंत कित्येक वेळां ऱ्हस्वाचा दीर्घ उच्चार करावा लागत असेल, तर उलट दीर्घाचा ऱ्हस्वहि उच्चार करावा लागतो. पण हे उच्चार अपवादादाखलच होत. तो नियम नव्हे. माधवराव पटवर्धन हे वरील नियमच सांगून थांबले नाहींत, तर त्यांनीं छन्दाचे 'पद्मावर्तनी' व 'भृंगावर्तनी' असे भेदहि पाडले आहेत. हे भेद केवळ गणिती हिशेबानें दाखविले असून ते कृत्रिम आहेत. 'आवर्तन' ठरविण्याचें गमक कोणतें, याची स्पष्टता माधवराव यांच्या विवेचनांत नाहीं. आवर्तन ओळखण्याची खूण 'यति' हीच समजावी लागेल; परंतु माधवराव यांनीं पाडलेल्या आवर्तन-विभागावरून यतीचा व आवर्तनाचा संबंध आहे ही गोष्ट अनुभवाला पटत नाहीं. एकच उदाहरण नमुन्याकरितां देतों.

देवीवर छन्द [ – – प – – ] ८ अक्षरें

"रूप पाहतां लोचनीं
सुख झालें वो साजणी"
"सर्व सुखाचें आगर
बाप रखमादेवीवर"

हा अभंग सर्वपरिचित आहे. या अभंगाला साधी चाल लावतां येते व गायकी चालहि लावतात. म्हणजे तालांत बसवून म्हणतात. परंतु दोन्हीं प्रसंगीं सर्व अक्षरें गुरु उच्चारलीं जातात काय?– ही गोष्ट वाचकांनीं समजून घ्यावी. आवर्तनाचा सिद्धान्त सर्वत्र लागू करावयाचा प्रयत्न माधवराव यांनीं कां केला हेंच कळत नाहीं. 'आवर्तनी छन्द' म्हटलें म्हणजे त्यांतील सर्व आवर्तनें पुरीं व्हावयासच पाहिजेत. नाहीं तर 'आवर्तन' या शब्दाला महत्त्व तें काय राहिलें? माधवराव यांचा सिद्धान्त मान्य करणारे, प्रा. वि. म. कुलकर्णी यांनीं 'वृत्तें व अलंकार' या पुस्तकांत 'पतितपावन' छन्दाचें उदाहरण दिलें आहे. तें असें: (या ठिकाणीं मुद्दाम सांगून ठेवावयाला पाहिजे कीं, छन्द जितक्या मात्रांचा असेल त्याच्या निमपट अक्षरें त्यांत असावयाचीं हें एक गृहीतकृत्य मानलेलें आहे)

"॥ बघा माझी बेबी किती आहे तरी गोड् ॥
॥ उतर ना खालीं बेबी जरा तरी सोड् ॥".

'छन्दोरचने'तील दुसरें उदाहरण —

"॥ अखंडित असावेसें वाटतें पायीं ॥
॥ साहोनी संकोच ठाव थोडासा देईं ॥"

पतितपावन छन्दाचें लक्षण

[ प । प । प । – ] अक्षरें १३

यामध्यें 'पद्मावर्तनी' तीन आवर्तनें पूर्ण दाखविलीं आहेत. परंतु चौथें आवर्तन पुरें व्हावयाचें आहे किंवा नाहीं? असेल तर भरतीच्या सहा मात्रा चरणाच्या शेवटच्या अक्षरावरच भरून काढावयास पाहिजेत. परंतु उच्चार करण्याच्या दृष्टीनें हें सर्व चमत्कारिक व अस्वाभाविक वाटतें. आवर्तनाचें नसतें बंधन छन्दावर लादलें आहे! चरणाच्या पोटांतील 'आवर्तन विभाग' पाडण्याला अगर सिद्ध करून दाखविण्याला 'यती'चाच आधार असला पाहिजे. त्याशिवाय त्याची उपपत्तीच नीट सांगतां येणार नाहीं. प्रा. वेलणकर यांनीं वृत्ताच्या चरणांतील 'यति' व त्याच्या अनुषंगानें चरणाचे पडणारे विभाग हें पाहूनच 'वृत्तघटक' ठरविले आहेत ('सह्याद्रि', फेब्रुवारी, १९५५. यांतील श्री. जोशी यांचा लेख पहा.) हाच न्याय आवर्तन ठरविण्याच्या बाबतींत मान्य करावा लागेल. आधीं आवर्तन ठरवावयाचें व मग 'यति' ठरवावयाचा, असा उलटा क्रम मात्र कोणी सांगूं लागेल तर योग्य नव्हे, ही गोष्ट मुद्दाम येथें स्पष्ट केली पाहिजे.

असो. एकंदरींत मला म्हणावयाचें आहे कीं, माधवराव यांचा वरील नियम गृहीत धरतां येणार नाहीं. कै. राजवाडे व कै. गोडबोले यांच्या लक्षांत



अनुक्रमणिका

एवढी साधी गोष्ट कशी आली नाहीं, असा मोठा प्रश्न पडतो. " लगत्वभेदेंकरून त्याचे ( अभंगाचे ) उपप्रकार कल्पिण्यांत कै. विश्वनाथ का० राजवाडे यांची चूक झाली आहे " असें विधान माधवराव पटवर्धन यांनीं ' छन्दोरचनें'त ( प्रथम आवृत्ति पान ८३ ) केलें आहे; परंतु खरें म्हटलें तर कै. राजवाडे व कै. गोडबोले यांचें या बाबतींत अज्ञान नसून माधवराव यांच्याच विचारसरणींत दोष आहे.

पद्यप्रकाराला चाल कोणती लावावयाची, याचाहि विचार करावा लागतो. छन्दांतील प्रत्येक अक्षर दीर्घच उच्चारावयाचें, व त्या उच्चाराला जमेल तीच चाल गृहीत धरावयाची, असें जर कोणाचें या बाबतींत समथन असेल तर तेंहि मान्य करतां येणार नाहीं. पद्याच्या लिखिताप्रमाणें ऱ्हस्व दीर्घ अक्षरें जशीं असतील तशींच उच्चारून म्हटलीं पाहिजेत, हाच सर्वसामान्य नियम होय. पद्य म्हणण्याची चाल अगर धाटणी अशीच असली पाहिजे कीं, त्या चालीवर म्हणतांना ऱ्हस्व दीर्घ अक्षरांच्या स्वाभाविक उच्चारामध्यें कांहीं फरक करण्याचा प्रसंग येऊं नये. ( कोठें मात्रा भरून काढावयाच्या असतील तर शब्द न तोडतां शब्दाच्या अन्त्य अक्षरावर मात्रा भरून काढाव्या व तें शब्दाचें अंत्य अक्षर दीर्घ असावें. ) असा फरक करण्याचा प्रसंग येत असेल तर ती योजलेली चाल अगर धाटणीच योग्य नाहीं असें समजावें. अथवा योजलेली चाल योग्यच आहे, असें गृहीत धरावयाचें असेल तर त्या पद्याची रचना शिथिल झालेली आहे, असें तरी मान्य करावें. चाल कोणती लावावयाची याच्यावरहि कांहीं तरी बंधन मानावेंच लागेल. याशिवाय छन्दःशास्त्रकार दुसरा कोणताच पर्याय काढूं शकणार नाहीं. चालीविषयीं विचार करतांना प्रा. रा. श्री. जोग यांनीं जो अभिप्राय व्यक्त केला आहे, तो येथें उपयुक्त होईल म्हणून थोडक्यांत उद्धृत करतो. प्रा. जोग म्हणतात ( ' अभिनव काव्य-प्रकाश ', पान ३०५. ) कीं, " शब्द जसे लिहिले आहेत तसेच ते लघुगुरुत्व लक्षांत घेऊन उच्चारले असतां नीटपणें पद्यांत किंवा तालांत उच्चारले जावे असें लेखन करणें हें आवश्यक आहे. म्हणजेच पद्याच्या चालीकरितां कोणास कांहीं विचारण्याची गरज उरत नाहीं. तसें न केलें तर पद्य बरोबर म्हणतां येण्यास कवीकडेच धांव घ्यावी लागेल. "

छन्दाच्या बाबतींत ' ल–ग–त्व ' भेद मानावयाचा नाहीं, असें माधवराव गृहीत धरतात. परंतु याच्या उलट ते असेंहि म्हणतात कीं, "व्यवहाराच्या भाषेंतसुद्धां लघुगुरुभेद आहे. हा ' लगत्वभेद ' भाषेच्या हाडींमांसींच नव्हे तर अगदीं स्वभावांत भिनला आहे. " ( ' छन्दोरचना ', पान ४४. ) आणखी असें सुद्धां बजावतात कीं, " आधुनिक मराठी कविता लेखनाप्रमाणें सलग स्पष्ट वाचीत गेल्यानें तिच्यांतील छन्दाचा बोध आपोआप होतो. हा जो बहुमोल विशेष मोरोपन्त-देवलादि पद्यप्रभूंनीं मराठींत कमावून आणला आहे, तो गमावणें अनर्थावह होईल. " – ( ' छन्दोरचना ', पान ८१. ) या परस्परविरुद्ध बोलण्याचा मेळ कसा घालावयाचा, हें एक मोठें कोडेंच आहे. मोरोपन्तांनीं ' सीतागीत ' अभंगांत रचलें आहे. तें लेखनाप्रमाणें सलग स्पष्ट वाचीत म्हणावयाचें, ही रीतच मोरोपन्तांना अभिप्रेत असावी असें वाटतें. किंवा दुसरी रीत असेल तर आज कळावयास मार्ग नाहीं. या बाबतींत वाचकांनींच विचार करून पहावा म्हणून या 'सीतागीता'चा उल्लेख केला आहे.

ऋग्वेदांत लगत्व-भेद नाहीं, असा एक आधार या वादामध्यें पुढें करण्यांत येईल. परंतु ऋग्वेदांत लगत्व-भेद नाहीं याचा अर्थ असा समजावयास पाहिजे कीं, गायत्री वगैरे छन्दांच्या चरणांत अमुक अक्षरें लघु व अमुक अक्षरें गुरू असा नियम नाहीं. न हून ' सर्वत्र अक्षरें गुरु ' वगैरे जें अनुमान काढण्यांत येतें तें चूक आहे. या माझ्या म्हणण्याला पुरावा म्हणून मी पुढील उतारा देत आहे.

संस्कृत पिंगल-शास्त्राला श्री. धूपकरशास्त्री यांनीं प्रस्तावना लिहिली आहे त्यांत ते म्हणतात कीं,

" दृश्यन्ते हि नानाविधवृत्तानां मातृकायमाणा मंत्रभागा वेदे । यथा —

' पूषण्वते ते चकृमा करम्भम् ' इति इंद्रवज्रायाः
' स्तुहि श्रुतं गर्तसदं युवानम् ' इति उपेंद्रवज्रायाः
' रथं न दुर्गाद्वसवः सुदानवः ' इति वंशस्थस्य
' यूना ह सन्ता प्रथमं वि जज्ञतुः ' इति इंद्रवंशायाः

एवमेव अन्येषामपि वृत्तानां मूलभूताः पादाश्च अर्धर्चश्च तत्र तत्र शतशः उपलभ्यन्ते । ततश्च वेद एव मूलम् लैकिकानाम् अपि छन्दसाम् इति युक्तम्








उत्पश्यामः ".

असो. आतां शेवटीं या बाबतींत पत्रव्यवहारानें चर्चा केली आहे त्यांपैकीं तिघांच्या उत्तरांतील आवश्यक तो भाग देऊन हा लेख पुरा करीत आहे.

१ प्रसिद्ध साहित्यिक श्री. वा. ना. देशपांडे हे ता. २६।३।५३ च्या पत्रोत्तरांत कळवितात कीं, " छन्दःशास्त्रांत गृहीतकृत्य एकच घ्यावें लागेल. तें म्हणजे अक्षरांचें लघुगुरुत्व. पण ओवी-अभंगाचा प्रकार अस्तित्वांत असल्यानें त्यांच्या पुरतें हें गृहीतकृत्य थोडें मुरड घालूनच स्वीकारावें लागेल. छन्दःशास्त्र हें प्रयोगशरण शास्त्र असल्यानें त्यांत गृहीत कृत्यादिकांचा कांटेकोरपणा मानणें ठीक होणार नाहीं. "

२ प्रसिद्ध कवि श्रीयुत शान्ताराम आठवले हे ता. १५।२।५४ च्या पत्रोत्तरानें अभिप्राय देतात तो असा : " सर्व ओवी-अभंगांबद्दल मला सांगतां येणार नाहीं. पण पुष्कळ वेळां अक्षरें गुरु उच्चारावीं लागतात. ' भारत सृष्टीचें० ' या गीताबद्दल आपण विचारलें आहे. त्यांत मात्र अक्षरें दोन मात्रांचींच धरावयाचीं आहेत. ' सुखकर्ता दुखहर्ता ' या आरतीचा जो ऱ्हिदम् आहे तशा प्रकारें हें गीत म्हणावयाचें. "

३ मिरजेंतील एक नामांकित संस्कृतज्ञ शिक्षक श्रीयुत हरेरामपन्त बोडस हे आपल्या उत्तरांत कळवितात कीं, " अभंग-ओवी रचना माझ्या पूर्ण परिचयाची आहे. प्रत्येक अक्षर दीर्घ उच्चारणें शक्य नाहीं, नैसर्गिक नाहीं, श्रवणमधुर नाहीं, असें मलाहि वाटतें. ऋग्वेदांत लघु-गुरु भेद आहे हें जुन्या शास्त्रोक्त पद्धतीनें ऋचा म्हणतांना कळून येतें. ज्ञानेश्वरींतील ओव्या ओढाताण न करितां लघुगुरु असतील तसे उच्चारून ( अ – ताल ) गातां येतात. हाच अर्थ ज्ञानेश्वरांना अभिप्रेत असावा असें वाटतें." ( या संबंधीं ज्ञानेश्वरींतील ओंवी अशी –– " तैसा गाणिवेते मिरवी । गीतेवीणहि रंगू दावी । तो लोभाचा प्रबंधू ओवी । केला मिया ॥ " ज्ञानेश्वरी, अ० १८ ओ. १७४१. )

असे हे भिन्न भिन्न अभिप्राय कळून येतात. तेहि मी वाचकांपुढें विचारार्थ ठेविले आहेत.

---

## सामाजिक मानसशास्त्र [ पान १९ वरून पुढें चालू ]

ठेवण्याची फार दक्षता घ्यावी लागते. राष्ट्रांत नवीन विचारांचा उदय व्हावा, लोकांचें कल्याण साधावें आणि संस्कृतिसंवर्धन व्हावें म्हणून दर वीस वर्षांनीं राष्ट्रांत क्रांति झालेली बरी, असें अमेरिकन राष्ट्रघटनाकार जेफरसन म्हणत असे. अर्थात् क्रांति म्हणजे रक्तपात झालाच पाहिजे असें नसून लोकांमध्यें औदासीन्य उत्पन्न न होतां त्यांची वृत्ति सावधान राहिली पाहिजे.

सामाजिक मानसशास्त्राच्या अभ्यासाची आजच्या भारताला तर फारच आवश्यकता आहे. व्यक्तिस्वातंत्र्य आणि समाजनियंत्रण यांच्या मर्यादा समजून घेण्यासाठीं, लोकशाहीच्या कांहीं तत्त्वांत जरूर ते बदल घडवून आणण्यासाठीं साम्यवाद वगैरे निरनिराळया वादांची योग्य भूमिका समजावून घेऊन आपल्या राष्ट्रस्वभावाला आणि राष्ट्रीय आकांक्षांना अनुसरून त्यांमध्यें फेरफार करण्यासाठीं आणि आपलें राष्ट्र खरोखर लोकहितैषी बनविण्यासाठीं सामाजिक मानसशास्त्राचा अभ्यास उपयोगी पडेल. कारण ह्या शास्त्राकडून विविध प्रश्नांवर योग्य तो प्रकाश पाडला जाईल. भावी भारताचें भवितव्य लोककल्याण कळकळीनें साधूं पहाणाऱ्या समाजधुरीणांकडे आहे आणि त्यांना सामाजिक मानसशास्त्राकडून मार्गदर्शन होईल यांत शंका नाहीं.










प्रा. भा. शं. भणगे

# मुंबई-विद्यापीठांतील बोधभाषा

मुंबई-विद्यापीठांत शिक्षणाचें माध्यम कोणतें असावें याचा खल चालू आहे. ह्या प्रश्नाचा अभ्यास करून शिफारसी कराव्या म्हणून १० जून १९५५ ला विद्यापीठाच्या सिंडिकेटनें २३ तज्ज्ञांची एक समिति नेमली. ह्या समितीनें १२ विरुद्ध ११ अशा बहुमतानें हिंदी हीच एकमेव बोधभाषा असावी असा निकाल दिला आहे. समितीपुढें आलेला पुरावा, समितीमधील वेगवेगळया पक्षांचीं मतें आणि कांहीं सदस्यांच्या भिन्नमतप्रत्रिका आणि शिफारशी यांसह समितीचा अहवाल ( Report of the Committee on the Medium of Instruction to be adopted in the Bombay University) प्रसिद्ध झाला आहे. ह्या अहवालाचें प्रस्तुत लेखांत परीक्षण करावयाचें आहे. पार्श्वभूमि म्हणून माध्यमाच्या प्रश्नासंबंधीं कांहीं तात्त्विक विचार आरंभीं मांडले आहेत.

## इंग्रजीचें आणि हिंदीचें महत्त्व

प्रस्तुत वादामध्यें सर्व पक्षांचें एकमत होईल अशा दोन गोष्टी आहेत आणि त्या ह्या लेखांत गृहीत मानल्या आहेत. त्या अशा :

(१) **इंग्रजीचें महत्त्व.** इंग्रजी भाषेंतील ज्ञानसंपदा, आणि उदार कल्पना ह्यांचें महत्त्व सांगावें तितकें थोडेंच आहे. आंतरराष्ट्रीय संपर्कसंबंध यांसाठींहि आंग्ल भाषेची जरूरी आहे. इंग्रज राज्यकर्ते येथून गेल्यावर आणि स्वतंत्र भारत सर्व दृष्टींनीं प्रगतीच्या दिशेनें वेगानें वाटचाल करावयास उद्युक्त झाल्यावर इंग्रजी भाषेची आवश्यकता वाढली आहे असेंहि म्हणावयास हरकत नाहीं. त्या राज्यकर्त्यांचे ' परकी ' म्हणून इतर दोष अनंत असतील पण त्यांच्या केवळ संपर्कामुळें आंग्ल भाषा आणि त्या भाषेंतील ज्ञान ह्यांचा संपर्क भारतीयांना होत होता. तो आपसुक होणारा फायदा आतां मुद्दाम प्रयत्न करून मिळविला पाहिजे. भारताच्या प्रगतीसाठीं अत्याधुनिक ज्ञान आणि आंतरराष्ट्रीय संबंध हीं अत्यावश्यक आहेत. जुनाट विचारसरणीनें आणि इतरांपासून फटकून एकाकी असा भारत ( कदाचित् ) जगूं शकेल; परंतु प्रगति करूं शकणार नाहीं. आंग्ल भाषेच्या अभ्यासाविषयीं अलीकडच्या काळांत आस्था कमी झाली आहे. त्याचें कारण, ती परकी राज्यकर्त्यांची भाषा आहे म्हणून राष्ट्रीय चळवळीच्या काळांत झालेली तिची अवहेलना आणि त्याच चळवळींत वाढलेल्या स्वातंत्र्योत्तर काळांतील शिक्षणाधिकाऱ्यांचा हेकेखोरपणा हें होय. इंग्रजीचें महत्त्व लक्ष्यांत घेऊन आणि अलीकडील अनास्थेचें प्रतिक्रिया हें स्वरूप विचारांत घेऊन त्या भाषेची उपासना केली पाहिजे. ह्या उपासनेला इंग्रज राज्यकर्त्यांकडून जें उत्तेजन मिळे तें ह्यापुढें मिळणार नसल्यामुळें तिची संपूर्ण जबाबदारी विद्यापीठ आणि आणि स्वतंत्र शिक्षण – संशोधन – संस्था ह्यांच्यावर पडणार आहे. स्वतंत्र शिक्षण – संशोधन – संस्थांचा येथें जवळजवळ अभाव असल्यामुळें इंग्रजी शिक्षणाची जबाबदारी पूर्णतया विद्यापीठांवर पडते. ही जबाबदारी स्वातंत्र्यपूर्व काळापेक्षां बरीच अधिक आहे.

( २ ) **हिंदीचें महत्त्व.** भारतीय भाषांपैकीं हिंदी भाषा बोलणाऱ्यांची संख्या सर्वांत अधिक आहे. मोडकी-तोडकी हिंदी बरेच इतर भाषिकहि बोलूं शकतात. इंग्रजी भाषा न जाणणाऱ्या अनेक भाषिकांमध्यें सामान्य भाषा म्हणून हिंदीचा उपयोग गेल्या कांहीं वर्षांत रूढ झाला आहे. राष्ट्रीय चळवळींत आणि स्वातंत्र्योत्तर काळांत हिंदीला अप्रत्यक्षपणें एक प्रतिष्ठा प्राप्त झाली आहे ( किंवा देण्यांत आली आहे ). ह्यापुढें हिंदी ही मध्य-सरकारची आणि न्यायालयाची भाषा निश्चितपणें होणार आहे. घटक किंवा राज्यसरकारांचीहि हीच भाषा होण्याची शक्यता नाहीं असें नाहीं; राज्य-सरकारांनीं प्रादेशिक भाषांचा स्वीकार केला तरी त्यांनाहि हिंदीचा बराच वापर करावा लागेल. कारण असें कीं राज्य-सरकारें आणि केंद्र-सरकार ह्यांचे बहुल संबंध असतात, आणि त्यासाठीं हिंदीचाच उपयोग होईल. हिंदी संघराज्याची घटनात्मक घडण लक्ष्यांत घेतली आणि परत ( विकेंद्रीकरणाची भाषा बोलत बोलत प्रत्यक्षांत ) ' केंद्री 'करण करण्याचें राज्यकर्त्यांचें वर्तन









अनुक्रमणिका

विचारांत घेतलें तर राज्यसरकारांत हिंदीचा वापर मोठ्या प्रमाणांत करावा लागेल ह्यांत शंका नाहीं. खाजगी धंद्यांत किंवा सरकारव्यवस्थेंत नोकरी करणारे उमेदवार तयार करावयाचे नाहींत; पण उत्तम भारतीय नागरिक निर्माण करावयाचे असें ठरविलें तरी त्यांना हिंदीचें चांगलें शिक्षण दिलें पाहिजे. ह्या शिक्षणाची जबाबदारी केवळ विद्यापीठांवर मात्र पडणार नाहीं. इंग्रजी अमदानींत राज्यकर्त्यांकडून जसें इंग्रजीला प्रत्यक्षाप्रत्यक्ष प्रोत्साहन मिळे, तसें ह्यापुढें हिंदीला मिळेल. सरकारी मान्यतेच्या शाळांमधून सरकारनें धोरण आतांपासूनच काय ठेवलें आहे तें आपण पाहतोंच आहोंत. हिंदीचें शिक्षण देणाऱ्या स्वतंत्र संस्था आज बऱ्याच असून ह्यापुढें त्यांचें कार्य वाढणार आहे. पण ह्याचा अर्थ असा नव्हे कीं विद्यापीठानें याहि बाबतींत आपल्या जबाबदारींत कोणतीहि न्यूनता राहूं द्यावी.

## भाषेचें शिक्षण आणि शिक्षणाची भाषा

इंग्रजीचें आणि हिंदीचें हें महत्त्व ओळखून आणि ह्या भाषांच्या शिक्षणाची आपल्यावरील जबाबदारी ओळखून विद्यापीठानें बोधभाषेसंबंधीं काय धोरण ठेवावें ? एकाद्या भाषेचें चांगलें शिक्षण, ती भाषा सगळ्या शिक्षणाचें माध्यम केल्यानेंच होतें असें म्हणणें चुकीचें आहे. 'भाषेचें शिक्षण' आणि 'शिक्षणाची भाषा' ह्यांची गल्लत करतां कामा नये. शिक्षणाच्या भाषेमुळें त्या भाषेचें आपोआप थोडेंफार शिक्षण होत असतें हें खरें आहे. तरी शिक्षणाच्या भाषेची भूमिका केवळ ही नसून ती वेगळी आणि खूप व्यापक आहे. इंग्रजी आणि हिंदी भाषांच्या शिक्षणासाठीं ह्या भाषा बोधभाषा न करतां त्यांची दुसऱ्या मार्गानें व्यवस्था करावी. तो मार्ग असा कीं, ह्या भाषांचें अध्ययन विद्यापीठानें निदान पहिल्या पदवीपरीक्षेपर्यंत आवश्यक करावें. किंबहुना, इंग्रजीच्या बाबतींत असेंहि सुचवावेंसें वाटतें कीं विद्यापीठाच्या आतांपर्यंतच्या अभ्यासक्रमांत इंग्रजी हा आवश्यक विषय म्हणून त्याच्याकडे जें लक्ष पुरविलें जात आहे, त्यापेक्षां अधिक लक्ष पुढें देण्यांत यावें. शालेय अभ्यासक्रमांत इंग्रजीची आबाळ झाली आहे म्हणूनच विद्यापीठानें अधिक लक्ष द्यावें, इतकी आकुंचित भूमिका न ठेवतां मागें इंग्रजीचें जें माहात्म्य सांगितलें आणि इंग्रजीविषयीं विद्यापीठांची जी जबाबदारी सांगितली त्यामुळें ह्या भाषेच्या अभ्यासावर विशेष भर दिला पाहिजे.

एकाद्या भाषेच्या उत्तम शिक्षणासाठीं ती भाषा माध्यम म्हणून योजली तर एक शृंगापत्ति कशी उद्भवते पहा: इंग्रजी आणि हिंदी (आणि प्रादेशिक भाषा) ह्या सर्वांचेंच आपआपल्या परीनें प्रत्येक विद्यार्थ्यास महत्त्व आहे असें मानलें तर ह्या दोन्ही (किंवा तिन्ही) भाषा प्रत्येक विद्यार्थ्याच्या बाबतींत बोधभाषा म्हणून वापरल्या पाहिजेत— हा निष्कर्ष तर्कशुद्ध असला तरी हास्यास्पद आहे. एकाच विद्यार्थ्याला दोन (किंवा तीन) बोधभाषा ! ह्यांपैकीं एकच बोधभाषा करावी, तर इतर भाषांचा अभ्यास गौण आहे असें कबूल करण्याची पाळी येते. (प्रादेशिक भाषेचा प्रश्न जरी वादासाठीं सोडला तरी) इंग्रजी माध्यमाचे पुरस्कर्ते हिंदीचें अध्ययन कमी आवश्यक आणि हिंदी माध्यमाचे समर्थक इंग्रजी कमी आवश्यक मानतात काय ?

## बोधभाषेची भूमिका

बोधभाषेचा प्रश्न वेगळा करून त्यावर इतर दृष्टींनीं विचार केला पाहिजे. बोधभाषेची निवड करतांना केवळ शैक्षणिक दृष्टि ठेविली पाहिजे आणि ही निवड इतर दृष्टींनीं हानिकारक नाहीं एवढेंच पाहिलें पाहिजे. समाजांत आणि शिक्षण-क्षेत्रांतसुद्धां आज जो मूल्यांचा कोलाहल चालू आहे, आणि राजकीय दृष्टीला प्राथम्य देण्याची जी संवय ठाण मांडून बसली आहे, त्यामुळें वरील विधानावर जेवढा जोर द्यावा तेवढा कमीच वाटतो. शिक्षण घेऊन बाहेर पडल्यानंतर विद्यार्थ्याला नोकरींत शिरतां येण्याची सोय, देशांतील स्थलांतराची व संघटणाची सुलभता आणि राष्ट्रीय ऐक्य —ह्या बाबींचें महत्त्व फार आहे. परंतु हे उद्देश साधण्याचीं साधनें शिक्षणाच्या माध्यमाखेरीज इतरहि आहेत हें ध्यानांत धरावें. मात्र केवळ शैक्षणिक दृष्टीनें निवडलेलें माध्यम ह्यांच्या आड येणार नाहीं असें पहावें. समजा, प्रादेशिक भाषेची माध्यमासाठीं निवड केली. खेरीज मागें दाखविल्याप्रमाणें इंग्रजी आणि हिंदीच्या अभ्यासाचीहि सोय केली. तर वरील शिक्षणेतर उद्देशांमध्यें व्यत्यय येईल काय ? हिंदीच्या अभ्यासामुळें नोकरीची आणि संघटणाची सुकरता,








आणि प्रादेशिक भाषेच्या वाहनांतून दिलेल्या लोकशाही, राष्ट्रीयत्व वगैरे कल्पनांमुळें राष्ट्रीय ऐक्य हे उद्देश सिद्धीस जातीलच; त्यांना अवरोध तर होणार नाहींच. उलट पक्षीं, बिगरशैक्षणिक कारणांसाठीं बोधभाषेची योजना केली तर शैक्षणिक मूल्यांची गळचेपी झाल्या-वांचून राहणार नाहीं.

शैक्षणिक दृष्टि मुख्यतः अशी : ( १ ) ज्ञानाचें ग्रहण आणि ज्ञानाचा प्रसार. गुरुमुखांतून आणि ग्रंथ-वाचनांतून विद्यार्थ्यास जें ज्ञान मिळतें त्याचें आकलन सुलभ झालें पाहिजे. ह्यासाठीं विद्यार्थ्याची मातृभाषा हेंच ज्ञानाचें नैसर्गिक माध्यम ठरतें. आकलन ह्याचा अर्थ खोल आहे. ' समजलें ' एवढाच नसून ' जें समजलें तें विद्यार्थ्याच्या बौद्धिक प्रक्रियेंत एकजीव झालें, नैसर्गिक झालें ' असा परिणाम घडणें म्हणजे आकलन. ह्या अर्थानें शिक्षणाचें कार्य झालें असें समजतां येईल. २+२ = ४ हें ज्ञान न शिकलेल्या माणसाला असेल. पण हें ज्ञान व्हावयास त्याला प्रत्येक प्रसंगीं प्रयत्न करावा लागतो. पण शिकलेल्या माणसाला हेंच ज्ञान इतकें नैसर्गिक होतें कीं, तें ज्ञान वाटतच नाहीं. हा परिणाम फक्त मातृभाषेंतून घडवून आणतां येईल. येथ असा एक खुलासा करावयास हवा कीं ह्या परिणामाच्या बाबतींत मातृभाषेचें कार्य केवळ ती कमावलेल्या इतर भाषांपेक्षां सोपी असते म्हणून घडत नाहीं, ती नैसर्गिक असते म्हणूनहि घडतें. एखाद्या विद्यार्थ्याची मातृभाषेची तयारी फारशी चांगली नसतांना, त्या भाषेच्या माध्यमांतून त्याला ज्ञानग्रहण होतें, आणि कमावलेल्या भाषेंत चांगली तयारी असणारा विद्यार्थी ज्ञानांत दुबळा राहूं शकतो, याचें कारण मातृभाषेची नैसर्गिकता हें आहे.

मातृभाषेंतून ज्ञानाचा प्रसार होतो, ह्या विधाना-विषयीं कांहीं गैरसमज असल्यामुळें त्याचें स्पष्टीकरण केलें पाहिजे. मातृभाषेच्या एकदोन विरोधकांनीं प्रस्तुत लेखकास सांगितलें : ' विद्यापीठ हें जनतेसाठीं नाहीं. ' विद्यापीठाचें शिक्षण कांहीं निवडक विद्यार्थ्यांसाठीं असल्यामुळें मातृभाषेच्या योजनेनें जनतेला ज्ञान मिळेल हें खोटें आहे असें हे विरोधक सांगतात. विद्यापीठ हें जनतेसाठीं नाहीं, हें मान्य केलें तरी विद्यापीठांत दिलेलें ज्ञान जनतेपर्यंत पोहोंचलें पाहिजे हा हि मुद्दा शिल्लक रहातोच. असें म्हणण्यांत विशेषतः ज्ञानाचा प्रसार हा मुद्दा आहे. विद्यापीठांत मातृभाषा ही बोधभाषा झाली तर जो ग्रंथसंभार निर्माण होईल, त्याचें लोण विद्यापीठांत विद्यार्थी होण्याची संधि ज्यांस मिळाली नाहीं अशा सामान्यांपैकीं जिज्ञासूंपर्यंत पोचूं शकेल. ज्ञानप्रसाराची दुसऱ्या रीतीनेंहि शक्यता आहे. समाजाची भाषा एक आणि शिक्षणाची भाषा दुसरी, ह्या दुहीमुळें शिकलेले आणि न शिकलेले अशी दुही पडते, आणि न शिकलेल्यांस किंवा सामान्यांस शिक्षणाविषयीं ( आदरयुक्त ) दूरता वाटते, तर शिक्षितांस तें इतर आभरणांसारखें एक भूषण वाटतें. शिक्षितांस भूषणमात्र झालेलें शिक्षण हें खरें ज्ञान नव्हे. अशिक्षितांस तर ज्ञानाची दूरता वाटते; अशा परि-स्थितींत ज्ञानप्रसार कसा होणार ? शिक्षण एका बाजूस आणि दुसऱ्या बाजूस शिक्षित किंवा अशिक्षित ही दुही मातृभाषेच्या नैसर्गिकतेनें दूर होईल. ( शिक्षित आणि अशिक्षित अशी समाजाची विभागणी ही लोकशाहीच्या आणि राष्ट्रीय ऐक्याच्या दृष्टीनें निश्चित हानिकारक आहे हें वेगळेंच ).

( २ ) ज्ञाननिर्मिति. आतांपर्यंत ह्या देशांत ज्ञानाची आयात करण्याकडे अधिक कल होता. ही आयात करण्यांत ह्या देशाचा फायदाच झाला आणि पुढेंहि होईल. आयातीची गरज डोळ्यापुढें ठेवूनच इंग्रजी-ची प्रशस्ति केली होती. प्रत्येक समाजानें केवळ ज्ञानाच्या आयातीवर न जगतां स्वतः ज्ञाननिर्मिति केली पाहिजे. ह्या निर्मितीसाठीं परभाषेंतील ज्ञानाच्या ओळखीचा फायदा होतो. तसेंच स्वतःच्या समाजा-च्या संतत व्यापारांतून, विचारवंतांची प्रज्ञा आणि समाजजीवन ह्यांच्या परस्पर प्रतिक्रियेमुळें विचार-संभव होतो. विचारोद्भवाच्या ह्या प्रक्रियेंत विचारवंताचा समाजजीवनाशीं प्रज्ञेनें जोडलेला संबंध आवश्यक आहे. हा संबंध विचारवंतांच्या विचाराची भाषा आणि समाजाची भाषा ही एक असली तर विशेष शक्य आहे. आतांपर्यंत आंग्लभाषा-विभूषित मंडळी विचारनिर्मितींत किती दुर्बल ठरली तें नव्यानें सांगा-वयास नको. ह्या दुर्बलतेचा दोष केवळ व्यक्तींना दिला जातो, तें योग्य नसून पुष्कळ अंशीं हा दोष वरील संबंधाच्या अभावावर टाकला पाहिजे.

## तज्ज्ञ-समितीचा अहवाल

इंग्रजी, हिंदी आणि मातृभाषा ह्यांच्या भूमिका








काय असाव्या त्याचें विवरण येथपर्यंत केलें. इंग्रजी आणि हिंदीचें महत्त्व जाणून विद्यापीठानें त्यांच्या शिक्षणाची चोख व्यवस्था ठेवली पाहिजे आणि मातृभाषेलाच फक्त बोधभाषेचें स्थान देतां येईल असे विचार वर मांडले. हे विचार तात्त्विक चर्चेच्या स्वरूपाचे असून ते भारतांतील कोणत्याहि विद्यापीठांस लागू करतां येतील. मुंबई विद्यापीठांतील बोधभाषेचा प्रश्न ह्याच विचारांच्या पार्श्वभूमीवर तपासला पाहिजे. लेखाच्या आरंभीं उल्लेखिलेल्या मुंबई-विद्यापीठाच्या तज्ज्ञ-समितीच्या अहवालांत मुख्यतः तात्त्विक भूमिका मांडलली असल्यामुळें, ह्या अहवालाचें परीक्षण करण्या-पूर्वीं त्या परीक्षणामागील विचारसरणी विस्तारानें दिली. आतां ह्या अहवालाकडे वळावयास हरकत नाहीं. मुंबई-विद्यापीठाच्या अधिकारक्षेत्रांतील महा-विद्यालयांतील शिक्षकांचीं मतें ( प्रकरण ४ ) आणि तज्ज्ञ-समितीच्या सदस्यांची तत्त्वचर्चा ( प्रकरण ५ ) ह्यांवर अहवालाचा मुख्य भर आहे. खेरीज ह्या प्रश्नाचा इतिहास ( प्रकरण २ ) आणि इतर विद्या-पीठांचें धोरण ( प्रकरण ३ ) ह्यांनाहि महत्त्व दिलें आहे. प्रकरणें २, ३, ४ आणि ५ ह्या क्रमानें विचार करूं.

( अ ) **माध्यमाच्या प्रश्नाचा पूर्वेतिहास** – तज्ज्ञ-समितीनें राधाकृष्णन्-अहवालाचा उल्लेख केला आहे. इंग्रजीच्या पश्चात् हिंदी हीं केंद्र-सरकारची भाषा असावी आणि उच्च, दुय्यम व विद्यापीठाच्या शिक्षणासाठीं विद्यार्थ्यांना प्रादेशिक, केंद्र-सरकारची ( हिंदी ) भाषा आणि इंग्रजी अशा तीन भाषा अवगत असाव्या लागतील, ह्या राधाकृष्णन्–समितीच्या शिफारसीचा उल्लेख करून तज्ज्ञ-समिति पुढें म्हणते, " The final recommendation made by the (Radhakrishnan) Commission was, however, rather a halting one, namely, that the Universities should have the option to use the federal language as the medium of instruction, either for some or for all subjects as an alternative to the regional language " ( पान ६ ). राधाकृष्णन् - समितीच्या शिफारशींत halting ( अपुरें, अर्धवट ) असें काय आहे ? त्या समितीनें अगदीं असंदिग्ध शब्दांत प्रादेशिक भाषेची बोधभाषसाठीं शिफारस केली आहे आणि केवळ तिला पर्याय किंवा तिच्या जोडीस आणखी एक माध्यम म्हणून, हिंदी वापरावयास हरकत नसावी असें म्हटलें आहे. पहा--

" Through the federal language Indian solidarity must be secured and strengthened, but **without sacrificing the educational and cultural advantages** of the use of the mother-tongue at **all stages of education.**

" If the matter is looked at in this way, solution proposed by some, that the federal language should take the place of English and therefore should be recognised as the medium of higher education all over India and the language through which all administrative business should be transacted, **has to be discarded.** " — The Report of the University Education Commission, Vol. I, p. 320.

" Although we recognise that in the near future the **reginal languages will be the principal media of instruction at all stages** in all provinces, we consider it desirable that universities should have that option to use the federal language as the medium of instruction either for some subjects or for all subjects. In case **both languages** are employed, how the two will be combined is a matter which the institutions trying the experiment should be allowed to settle. **No obstacle should be placed**












in the way of colleges or universities which desire to make such an experiment. " — ( कित्ता, पा. ३२३. – जाड ठसा आमचा. )

वरील अवतरणांवरून हें स्पष्ट आहे कीं राधाकृष्णन्-समितीची शिफारस halting नाहींच, पण ती विशेषतः प्रादेशिक भाषेच्या बाजूची आहे ! मुंबई विद्यापीठाच्या तज्ज्ञ-समितीनें ( पा. ८ ). विद्यापीठाच्या ॲकॅडेमिक कौन्सिलनें २ एप्रिल, ५२ रोजीं मुंबई, सरकारला पाठविलेल्या पत्रांतील, जो मजकूर दिला आहे, तो महत्त्वाचा आहे. त्यांत स्पष्ट म्हटलें आहे कीं शैक्षणिक दृष्ट्या प्रादेशिक भाषा किंवा मातृभाषा हीच शिक्षणाचें नैसर्गिक माध्यम होय, आणि हिंदीची वाढ झाल्यावांचून, हिंदीचा राष्ट्रीय भाषेमध्यें विकास झाल्यावांचून तिला माध्यमाचें स्थान देतां येत नाहीं. ११ जून, १९५४ रोजीं ॲकॅडेमिक कौन्सिलनें पुनः हींच मतें मांडलीं. एका वर्षांत विद्यापीठाची ही भूमिका पार बदलून जाते ! इतकी बदलते कीं हिंदी माध्यमाची शिफारस करणारे तज्ज्ञ शैक्षणिक दृष्ट्या नैसर्गिक माध्यम कोणतें ठरेल त्याचा उल्लेखहि करीत नाहींत !

( आ ) **इतर विद्यापीठांची भूमिका.** – १२ विद्यापीठांनीं माहिती पाठविली. त्यांपैकीं कलकत्ता, दिल्ली आणि बडोदें विद्यापीठांनीं माध्यमाबाबत अजून कोणताच निर्णय घेतला नाहीं. मद्रासनें इंग्रजी माध्यम चालूं ठेवलें आहे; पण कांहीं परीक्षांना, कांहीं विषयांचीं उत्तरें भारतीय भाषेंत ( ? ) देण्याची विद्यार्थ्यांना मुभा दिली आहे. बाकीं ८ विद्यापीठें आणि त्यांचीं माध्यमें अशीं :

**पुणें, गुजरात** -- प्रादेशिक भाषा.

**सागर, अलाहाबाद, बनारस** – हिंदी.

**नागपूर** -- हिंदी, मराठी.

**कर्नाटक** -- कन्नड, हिंदी इंग्रजी.

**राजपुताना** -- कांहीं परीक्षांना हिंदींत उत्तरें देण्याची मुभा.

पुणें, गुजरात, कर्नाटक आणि नागपूर ह्यांनीं प्रादेशिक भाषांचा अंगीकार केला आहे. सागर, अलाहाबाद आणि बनारस ह्या विद्यापीठांनीं हिंदीचा स्वीकार करण्यांत आपल्या अधिकारक्षेत्रांतील प्रादेशिक भाषेचाच स्वीकार केला आहे. राजपुतान्यानें हिंदीची मुभा देऊन त्याच दिशेनें पाऊल टाकलें आहे. ह्या माहितीवरून अहवालांत कोणताच निष्कर्ष काढलेला नाहीं. तो निष्कर्ष काढला तर प्रादेशिक भाषेच्या बाजूनें काढावा लागेल !

( इ ) **शिक्षकांचीं मतें.** – शिक्षकांच्या मतांवर स्वतंत्र प्रकरण असलें तरी त्यांचीं मतें विचारतांना पुरेशी काळजी घेण्यांत आली नाहीं, असें खेदानें म्हणावें लागतें. शिक्षकांना प्रश्नपत्रिका न पाठवितां शिक्षकांचीं मतें प्राचार्यांनीं घेऊन तीं पाठवावयाचीं होतीं ( छेदक ६ ). कांहीं महाविद्यालयांत प्रत्येक शिक्षकाला प्रश्नपत्रिका देऊन ती भरून घेतली असली तरी सर्वच विद्यालयांत तसें करण्यांत आलें असेल असें नाहीं. महाविद्यालयांच्या प्राचार्यांनीं पुरविलेली माहिती अहवालाला जोडलेल्या तिसऱ्या परिशिष्टांत दिली आहे, ती पाहिली असतां त्यांत बऱ्याच उणीवा दिसतात. कोणत्याहि एका भाषेवर एकमत झालें नसल्यास वेगवेगळया भाषांना कितीजणांचा पाठिंबा मिळाला तें कांहीं विद्यालयांनीं दाखविलें आहे, कांहींनीं दाखविलें नाहीं. ज्यांनीं तसें दाखविलें नाहीं, त्यांच्यापैकीं कांहींनीं अमुक अमुक पक्ष आहेत एवढेंच सांगितलें, बहुमत कोणत्या पक्षाचें तें सांगितलें नाहीं; तर कांहींनीं अमुक पक्षास बहुमत असें सांगितलें. कांहींनीं बहुमताचें प्रमाण किती आहे तें दाखविलें नाहीं. बहुमत एका मतानेंसुद्धां असूं शकतें. तसें झालेंहि आहे. तसेंच प्रत्येक पक्षाचीं मतें पाहिलीं असतां त्यांत एखाद्या पक्षास बहुमत असलें तरी इतर पक्षांचीं एकत्र मतें बहुमतवाल्या पक्षापेक्षां अधिक असूं शकतील. हाहि प्रकार ह्या परिशिष्टांत पहावयास मिळतो. हे दोन्ही प्रकार हिंदी बहुमताला अनुकूल झाले आहेत !

मुंबईतील एकंदर ३१ महाविद्यालयांपैकीं फक्त २५ महाविद्यालयांनींच माहिती पाठविली आहे ! राहिलेल्या महाविद्यालयांत कांहीं महत्त्वाचीं महाविद्यालयें आहेत. २५ महाविद्यालयांपैकीं फक्त ११ महाविद्यालयांनीं हिंदी माध्यमास संपूर्ण पाठिंबा दिला आहे. अहवालांत फक्त बहुमतानें मिळालेल्या पाठिंब्याचा उल्लेख असून तो १८ विद्यालयांनीं दिला असें म्हटलें आहे ( छेदक ३६ ). ३ ऱ्या परिशिष्टांत फक्त १६










महाविद्यालयांमधील हिंदीचें बहुमत असंदिग्ध दिसतें, त्याचें कारण परिशिष्ट भरण्यांतील दोष असावा. ज्या ११ महाविद्यालयांनीं केवळ हिंदीस पाठिंबा दिला, त्यांमध्यें ५ वैद्यकीय महाविद्यालयें आहेत, १ शास्त्र-महाविद्यालय आहे, पुण्याच्या डेक्कन एज्युकेशन सोसायटीनें चालविलेलें बॉम्बे कॉलेज आहे, भवन कॉलेज आहे. आणि किशनचंद चेलाराम, जय हिंद आणि नॅशनल हीं कॉलेजें आहेत. वैद्यक, शास्त्र, आणि तंत्रविज्ञान या शास्त्रांस कांहीं काळ इंग्रजी माध्यमच राहूं द्यावें असें मत बरेंच प्रभावी असल्यामुळें वरील ५ वैद्यकीय (आणि १ शास्त्रीय) विद्यालयांच्या हिंदीच्या पाठिंब्याचें बळ कमी होतें, असें म्हणावयास हरकत नाहीं. पान ६५ वरील शिक्षकांच्या मातृभाषांचें वर्गीकरण पाहिलें असतां किशनचंद, जय हिंद आणि नॅशनलमधील भाषिकांचें प्रमाण इतर विद्यालयांपेक्षां वेगळें आहे. [1]

भवन कॉलेजमध्यें फक्त हिंदीचा पक्ष दाखविला आहे. आणि त्याचीं मतें १७ दाखविलीं आहेत. भवन हें कॉलेज इतकें लहान आहे कीं, मतें दाखविण्यांत कांहीं चूक राहिली आहे कीं काय, याचा उलगडा होत नाहीं. कारण शिक्षकांचें भाषावार वर्गीकरण दाखविणाऱ्या तक्त्यांत ह्या महाविद्यालयाचें नांव नाहीं.

संपूर्णतया हिंदीचा पुरस्कार करणाऱ्या महाविद्यालयांची (२५ पैकीं ११) अल्पसंख्या आहे. बहुसंख्य महाविद्यालयें (२५ पैकीं १८) हिंदीच्या बाजूस आहेत असें म्हणतांना त्या महाविद्यालयांत हिंदी–पक्षाचें बहुमत आहे, एकमत नाहीं ही गोष्ट विसरून चालणार नाहीं. तसेंच हिंदी पक्षाच्या बाजूनें बहुसंख्य महाविद्यालयें असलीं तरी बहुसंख्य शिक्षक आहेत कीं काय तें अहवालावरून किंवा परिशिष्टावरून कळत नाहीं.

मुंबईंतील विद्यालयांचा हा हिंदीच्या बाजूचा कौल अहवालकर्त्यांना 'a matter for some surprise' असा वाटतो. त्यानंतर ते लगेच म्हणतात, "At the same time, it unmistakably indicates that this trend is due to a correct appraisal of the realities of the situation and an appreciation of the necessity of taking a long view unbiassed by any sentimental considerations which are likely to cloud important issues on which well-considered decisions are called for" (छेदक ४०). ह्या लेखांत वर जी टीका दिली आहे ती खरी असली तर अहवालांतील हें मत शिक्षकांच्या मताचें correct appraisal (अचूक मूल्यमापन) ठरणार नाहीं. तसेंच अहवालांतील ह्या मतप्रदर्शनांत हिंदी–पक्षास श्रेय देत असतांना इतर पक्षांवर अन्यथा मत व्यक्त झालें आहे असें वाटतें.

(आी) **तज्ज्ञांचीं मतें.**— तज्ज्ञांच्या मतांस विशेष मान दिला पाहिजे. २३ तज्ज्ञांपैकीं १२ तज्ज्ञ हिंदीचे पुरस्कर्ते आहेत. ही बहुसंख्या तांत्रिक आणि अगदींच लहान आहे.— केवळ एका मतानें कौल ठरला! ह्या १३ पुरस्कर्त्यांत समितीच्या अध्यक्षांचें मत समाविष्ट आहे. (विद्यापीठाच्या उपकुलगुरूंचें नांव तज्ज्ञांच्या यादींत शिरोभागीं दिलें असल्यामुळें त्यांना अध्यक्ष असें येथें समजण्यांत आलें आहे. परंतु अध्यक्ष असा त्यांचा उल्लेख नसल्यामुळें वरील विधान वाचकांनीं साशंकतेनेंच घ्यावें).

हिंदी पक्षाची कैफियत ४५ आणि ४९ ह्या छेदकांत मांडली आहे. हिंदीच्या पुरस्काराचीं कारणें अशीं :

१. राष्ट्रीय ऐक्य हिंदीनें साधेल. ही बहुसंख्य लोकांची भाषा आहे.

२. हिंदी सरकारी कामाची भाषा होईल.

३. ती केंद्र-सरकारच्या पब्लिक सर्व्हिस कमिशनच्या परीक्षांची भाषा असेल.

४. आंतरराज्य परिषदांचें कामकाज हिंदींत चालेल.

१ शिक्षकांच्या मातृभाषांचें वर्गीकरण

| | मराठी | गुजराती | सिंधी | इतर |
|---|---|---|---|---|
| किशनचंद | १४ | ४ | १८ | ११ |
| जय हिंद | १० | १२ | ३६ | १० |
| नॅशनल | १६ | ६ | १६ | १२ |

२, ३, ४ ह्या कारणांमुळें हिंदी कमी येणारे विद्यार्थी मागें पडतील. अशा – रीतीनें, मुंबई-विद्यापीठानें प्रादेशिक भाषेंत शिक्षण दिलें तर काय होईल पहा. " This would deprive Bombay of the leading position it occupies today in the national life of the country.... The Bombay University ... would cut itself from the stream of national life. "

५. बहुभाषिक मुंबईंत अनेक भाषा माध्यमें म्हणून स्वीकारल्यास अध्यापन आणि परीक्षा या बाबतींत सारखे मानदंड योजतां येणार नाहींत.

६. प्रादेशिक भाषा विद्यापीठांनीं स्वीकारल्यास विद्यार्थ्यांना आणि शिक्षकांना एका विद्यापीठांतून दुसऱ्या विद्यापीठांत जातां यावयाचें नाहीं व आंतर-विद्यापीठीय संबंध ठेवणें अवघड होईल. त्यामुळें intellectual inbreeding चा फार मोठा धोका आहे.

तज्ज्ञांपैकीं बहुमतवाल्या पक्षानें मुख्यतः पहिल्या दोन कारणांवर आपली भूमिका आधारली आहे ( छेदक ४९ ). हीं कारणें राजकीय आहेत. बिगर-शैक्षणिक कारणांवर शैक्षणिक माध्यमाची निवड करणें गैर आहे. हिंदी–पक्षाचें तिसरें कारण बिनबुडाचें आहे. केंद्राच्या पब्लिक सर्व्हिस कमिशननें परीक्षांची भाषा कोणती ठेवावी ह्यावर ह्याच तज्ज्ञांना विचार करावयास सांगितलें होतें, आणि त्यांनीं इतर संबंधितांचा सल्ला घेतल्यावांचून समाधानकारक निर्णय देतां येत नाहीं, असें म्हटलें आहे ( छेदक ६५ ). असें असतां त्यांच्यापैकीं कांहींनीं प० स० कमिशनची परीक्षा-भाषा हिंदी राहील असें मानण्यांत काय अर्थ आहे ? ' Stream of national life ही ' शब्दसंहति ( सरकारी नोकऱ्या – ह्या ) अगदीं आकुंचित अर्थानें वापरली आहे. विद्यापीठाला खऱ्या अर्थानें राष्ट्रीय जीवनाच्या धारेंत पडावयाचें असेल तर प्रादेशिक भाषेचा स्वीकार करावा लागेल.

बहुमतवाल्या पक्षाच्या सर्व मुद्द्यांना अहवालांतच उत्तरें सांपडतात. पहिल्या मुद्द्यास उत्तर असें कीं एकभाषेनें भारताचें ऐक्य साधण्याऐवजीं अनेक भाषांमधून दिलेल्या समान कल्पना आणि ध्येयें यांनीं तें साधणें अधिक योग्य होय ( छेदक ४६ ). दोन, तीन या मुद्द्यांस उत्तर असें कीं, नोकरीपुरतें हिंदी, ती भाषा माध्यम न करतां देतां येईल. हा मुद्दा म. म. दत्तो वामन पोतदार ह्यांनीं आपल्या भिन्नमतपत्रिकेंत दिला आहे. हाच मुद्दा ह्या लेखांत मागें येऊन गेला आहे. म. म. पां. वा. काणे ह्यांनीं आपल्या भिन्नपत्रिकेंत जी स्पष्टोक्ति केली आहे ती सर्वांनाच उद्बोधक ठरेल. ( – पां. वा. काणे मुंबई-विद्यापीठाचे कांहीं काळ उपकुलगुरु होते हा संदर्भ विचारांत घ्यावा – ). काणे म्हणतात कीं, विद्यार्थ्यांना आम्हीं नेहमीं सांगतों कीं शिक्षण हें ज्ञानासाठीं आहे नोकरीसाठीं नाहीं – आणि त्यांना नोकऱ्या मिळण्यासाठीं त्यांच्या शिक्षणाचें माध्यम योजतों ! ह्या दोन गोष्टी विसंगत आहेत ( पान ४३ ). आज सर्व क्षेत्रांत – शिक्षणक्षेत्रांतसुद्धां, तत्त्व आणि धोरण ( किंवा आचार ) ह्यांत जी विदारक विसंगति दिसते आहे त्याचें उदाहरण म्हणजे बहुमतवाल्या पक्षाची हिंदीची शिफारस ! चौथ्या मुद्द्यास उत्तर बहुमतवाल्या पक्षानें स्वतःच दिलें आहे. ह्या पक्षानें इंग्रजीच्या पक्षास असें उत्तर दिलें आहे कीं, आंतरराष्ट्र-परिषदांसाठीं जेवढें इंग्रजी लागेल तेवढें आमच्या अभ्यासक्रमांत असणार आहे ( छेदक ५१ ). ह्या विधानांत ' आंतरराष्ट्र ' ऐवजीं 'आंतरराज्य' म्हणावें, ' इंग्रजी ' ऐवजीं ' हिंदी ' म्हणावें म्हणजे झालें ! पांचव्या मुद्द्यांत उपस्थित केलेल्या अडचणींवर सहज उपाय शोधून काढतां येतील हें पोतदारांचें म्हणणें बरोबर आहे. खेरीज आजहि मराठी, गुजराती वगैरे वाङ्मयाचे विद्यार्थी एकाच परीक्षेला बसतात. तेव्हां त्यांना जर सारखे मानदंड लावतां येतात, तर एकाच परीक्षेला एकच विषय अनेक भाषांत शिकवितांना किंवा लिहितांना सारखे मानदंड योजणें सोपें आहे. सहाव्या मुद्द्याला काणे यांनीं उत्तर दिलें आहे तें असें कीं, विद्यापीठ बदलणारे विद्यार्थी आणि अध्यापक किती असतात त्याचे आंकडे उपलब्ध नाहींत आणि ते फारसे मोठे नसावेत. मुंबई – विद्यापीठाच्या बाबतींत असेंहि म्हणतां येईल कीं त्याच्या लगत जीं तीन विद्यापीठें आहेत – पुणें, कर्नाटक आणि गुजरात– त्यांच्याशीं ह्या विद्यापीठाचे विद्यार्थी–अध्यापक ह्यांच्या बदलीचे संबंध विशेष येणार, आणि हीं तिन्हीं विद्यापीठें प्रादेशिक आहेत. केवळ मुंबईनें हिंदी माध्यम






ठेवून प्रश्न सुटत नाहीं. आमचीं कारणें केवळ राजकीय नसून शैक्षणिकहि आहेत असें म्हणून तज्ज्ञांमधील बहुमतवाला पक्ष सहाव्या मुद्द्याचा उल्लेख करतो, त्यांत फारसा अर्थ नाहीं ( " It is a minor point " – काणे ) असें दिसतें. Intellectual inbreeding ही भीति अतिशयोक्तिपूर्ण आहे.

बहुमतधारी तज्ज्ञांच्या पुरस्कारांत दोन गोष्टींचा उल्लेख अभावानें जाणवतो. – केवळ शैक्षणिक दृष्ट्या विद्यार्थ्यांस ज्ञान संक्रांत करावयास सर्वोत्तम माध्यम कोणतें आणि प्रादेशिक भाषांचा स्वीकार केला तर बहुभाषिक मुंबईंत महाविद्यालयांच्या पुनर्घटनेंत कोणत्या अडचणी येतील ? – पहिली गोष्ट तात्त्विक आहे, दुसरी व्यावहारिक. बहुमतधारी पक्षाची भूमिका तात्त्विक असल्यास पहिल्या गोष्टीचा उल्लेख यावयास हवा, व्यावहारिक असल्यास दुसऱ्या गोष्टीचा उल्लेख करावयास हवा. पहिल्या अनुल्लेखाविषयीं वर टीका आली आहे. इंग्रजी माध्यम सोडावयाचें असेल तर महाविद्यालयांची पुनर्घटना करावी लागेल. हिंदीचा स्वीकार केला तरच पुनर्घटना कमींत कमी अडचणीची होईल. हिंदीच्या बाजूनें जें सांगतां येईल तें एवढेंच आहे. पण ह्या प्रश्नाबाबत अहवालांत मुग्धता स्वीकारली आहे !

( उ ) **शिक्षकांचें शिक्षण.** – अहवालावरून असं दिसतें कीं हिंदी बोधभाषा झाल्यानंतर सध्यांच्या शिक्षकांना जें हिंदीचें चांगलें शिक्षण द्यावयास हवें, त्या बाबतींत शिक्षकांस आणि बहुमतधारी तज्ज्ञांस फारशी अडचण दिसत नाहीं. परंतु प्रा. गोवर्धन पारीख आणि प्रा. काणे ह्यांनीं दाखविल्याप्रमाणें जवळजवळ ९० टक्के शिक्षकांना हिंदीचें शिक्षण घेतल्यावांचून गत्यंतर नाहीं. त्या बाबतींत अध्यापकांनीं आणि विद्यापीठाच्या अधिकाऱ्यांनीं ' laissez faire ' दृष्टिकोन धारण करणें योग्य ठरणार नाहीं.

( ऊ ) **प्रादेशिक भाषा.** – ज्या वेळीं मातृभाषा हेंच शिक्षणाचें माध्यम असावें असा आम्हीं पुरस्कार करतों, तेव्हां विद्यापीठांत येणाऱ्या विद्यार्थ्यांच्या जितक्या मातृभाषा असतील तितकीं माध्यमें असावीं असा अर्थ नसतो. विद्यापीठाच्या क्षेत्रांतील महत्त्वाच्या मातृभाषा किंवा प्रादेशिक भाषा एवढाच अर्थ अभिप्रेत असतो. अगदीं अलीकडे अशी एक बातमी आली होती कीं ( बहुरंगी ) मुंबई शहरांत ६७ भाषा आहेत ! मातृभाषेचे पुरस्कर्ते ६७ भाषांचा माध्यमासाठीं पुरस्कार करीत नाहींत. ते फक्त मराठी, गुजराती, हिंदी, आणि शक्य असल्यास सिंधी, इंग्रजी यांचा पुरस्कार करतात. अहवालामधील ( पा. १७ ) मुंबई विद्यापीठाच्या क्षेत्रांत येणाऱ्या सहा भाषांचा उल्लेख ( मराठी, गुजराती, सिंधी, हिंदी, कन्नड आणि उर्दु ) बरोबर नाहीं.

**निष्कर्ष**

अहवालाचें असें विस्तृत परीक्षण केल्यावर कांहीं निष्कर्ष काढतां येतील : ( १ ) हिंदीची बाजू शैक्षणिक दृष्ट्या दुर्बल आहे. ( २ ) बहुसंख्य विद्यालयांचा हिंदीस पाठिंबा आहे एवढें म्हणणें पुरेसें नाहीं. ( ३ ) तज्ज्ञांमधील हिंदीस अनुकूल बहुमत जेवढें किमान असूं शकेल तेवढेंच आहे. **१९६० पासून मुंबई विद्यापीठांत हिंदी हें एकमेव माध्यम क्रमाक्रमानें सुरूं करावें ही अहवालामधील शिफारस स्वीकारावयास हिंदीस जेवढें पाठबळ हवें तेवढें आज नाहीं असें म्हणावें लागतें.** प्रा. गोवर्धन पारीख यांनीं आपल्या भिन्नमतपत्रिकेंत वरील शिफारसींबद्दल जीं स्पष्ट विधानें केलीं आहेत त्यांच्याशीं सहमत झालें पाहिजे.

पुढें काय ? – हा प्रश्न रहातोच. ह्या लेखांत मांडलेली भूमिका मातृभाषांच्या पुरस्काराची आहे. ह्या पुरस्कारांतसुद्धां अति उत्साही असतां कामा नये. म्हणून इंग्रजी आणि हिंदीचें रास्त महत्त्व त्यांना द्यावें असें मार्गे सांगितलें. येथें आणखी असें सांगितलें पाहिजे कीं मातृभाषांचा स्वीकार एकदम न करतां टप्प्यांनीं करावा. अधिक स्पष्ट मांडणी करावयाची तर अशी :

( १ ) वाङ्मय, शास्त्र आणि व्यापार ह्या विभागांत होतां होईल तों लवकर इंग्रजीबरोबर मराठी, गुजराती आणि हिंदी हीं माध्यमें पहिल्या दोन वर्गांसाठीं सुरूं करावीं. एकाद्या विद्यालयानें मराठी, गुजराती आणि हिंदीपैकीं एकच माध्यम घ्यावें.

( २ ) इंग्रजीचें आणि हिंदीचें शिक्षण चारहि वर्गांत फार काळजीपूर्वक देण्यांत यावें.

( ३ ) हा बदल केल्यानंतर तीन वर्षांनीं ह्या बदलाचे परिणाम अभ्यासावे आणि पुढील निर्णय घ्यावा.

म. म. पां. वा. काणे आणि प्रा० गोवर्धन पारीख ह्यांच्या योजनांचा संगम ह्या योजनेंत व्हावयास हरकत नाहीं.








श्री. गिओवानी ग्वारेश्ची : अनु. – प्रा. गोवर्धन पारीख

# सॉलोमनचा निवाडा !

[ गिओवानी ग्वारेश्ची या इटालियन् लेखकाची ' डॉन कॅमिलो अँड हिज् फ्लॉक् ' ही कादंबरी प्रसिद्ध आहे. खेडयांतील एका पाद्याच्या चित्तवेधक ' साहसां'वर ती आधारलेली आहे. डॉन कॅमिलो हा तापट स्वभावाचा पाद्री आणि पेपॉने हा त्या गांवचा रागीट स्वभावाचा कम्युनिस्ट ' मेयर ' – यांच्या दैनंदिन जीवनांतील विविध प्रसंग तिच्यांत वर्णिले आहेत. कथेची मांडणी अशा प्रकारची आहे कीं तिच्यांतील प्रत्येक प्रकरण स्वयंपूर्ण व्हावें. त्यांतील एका प्रकरणाचा अनुवाद येथें दिला आहे. — अनु. ]

डॉन कॅमिलो आणि पेपॉने यांच्यांत कांहीं गैरसमज निर्माण झाला होता. एके दिवशीं त्यांनीं भेटून आपसांत तो लहानसा गैरसमज नुकताच दूर करून घेतला होता. त्याबद्दल त्यांना समाधान वाटत होतें. त्यानंतर मेयर पाद्र्याकडे वळून म्हणाला : " जीवनांतील प्रत्येक गोष्टीचें शोकांतिकेंत पर्यवसान होऊं देणें हें कांहीं फारसें शहाणपणाचें नाहीं. आपण कोणत्याहि गोष्टीचा शांतपणें विचार केला तर समझोता करणें आपणांस नेहमींच शक्य असतें."

" अगदीं बरोबर, " डॉन कॅमिलो स्निग्धतापूर्वक म्हणाला, " आपण विचारपूर्वक समजूतदारपणें वागलें पाहिजे अशी देवाची आपणांपासून अपेक्षा आहे. नाहींतर देवानें मुळीं आपल्याला मेंदूच कशाला दिला असता ? "

असा विचार करून दोघांनीं एकमेकांचा निरोप घेतला.

कांहीं दिवसानंतर त्या खोऱ्यांतील जीवनांत अशी कांहीं घटना घडली कीं जिच्यामुळें मनुष्य हा विचारशील प्राणी आहे हें सिद्धच व्हावें ! विशेषतः शेजाऱ्याशीं गुण्यागोविंदानें राहण्याच्या बाबतींत तर हा गुण स्पष्टपणें प्रकट होतो. तथापि प्रथम तुम्हाला त्या लहानशा जगाचा ' स्थानिक भूगोल ' नीट समजला पाहिजे. नाहींतर तुम्हांला कसलाच बोध व्हायचा नाहीं.

त्या प्रदेशांतून पो नदीचा प्रचंड प्रवाह कसलीहि तमा न बाळगतां सरळ वहात जातो; आणि दोन्हीं बाजूंनीं असंख्य ओढेनाले तो सारखा फुगवीत असतात. या ओढ्यांतलाच तिंकोने हा एक लहानसा ओढा. पीन्ह आणि ला रोका या दोन छोट्याश्या गांवांना जोडणारा मॉलिनेतो रस्ता हा पो नदीशीं समांतर-रेषेंत जातो; आणि एका ठिकाणीं तो तिंकोनेवरून जातो. तेथें एक पूल आहे. पुढें अवघ्या एका मैलावरच हा ओढा पो नदीला मिळत असल्यानें या ठिकाणीं तो बराच रुंद झाला आहे. यामुळें पूलहि कांहींसा मोठाच आहे. पीन्ह आणि ला रोका हीं दोन्हीं गांवें पुलापासून प्रत्येकीं सुमारें तीन मैलांच्या अंतरावर आहेत. तिंकोने ही जणुं त्यांच्यामधली सीमारेषाच होय. कथेची भौगोलिक पार्श्वभूमि अशा प्रकारची आहे.

पीन्ह आणि ला रोका या दोन गांवांमध्यें मुलांच्या शाळेवरून वाद धुमसत होता. दोन्हीं गांवांना मिळून एकच असलेली शाळा ही ला रोकांत होती. पीन्हच्या लोकांच्या दृष्टीनें ही अर्थातच गंभीर बाब म्हटली पाहिजे ! त्यांच्या मुलांना दररोज सहा मैलांची रपेट करावी लागे. तें खोरें एकाद्या मैदानासारखें सपाट असलें, तरी देखील सहा मैल म्हणजे तीस हजार फूट होतात. पुनः मुलें म्हटलीं कीं जवळच्या म्हणून आडवाटा शोधणारच. ज्या रस्त्यानें तीं जात तो एकाद्या तीरासारखा सरळ असल्यामुळें या आडवाटांमुळें त्यांना कितीतरी अधिकच चालावें लागे.

एके दिवशीं मेयरकडे म्हणजे पेपॉनेकडे पीन्हमधील स्त्रियांचें एक शिष्टमंडळ भेटावयास आलें. आणि ' आम्हांला आमची स्वतंत्र शाळा हवी, नाहींतर आमचीं मुलें आम्ही शाळेंत पाठवणार नाहीं ' असें त्यांनीं स्पष्टपणें सांगितलें. आतां गांव पडला एकाद्या पळपुट्या सशाइतकाच संपन्न !









अनुक्रमणिका

आणि नवी शाळा काढायची म्हणजे केवळ इमारतीसाठींच पैसा हवा असें नाहीं. शिक्षकांच्या पगाराचा खर्च देखील दुप्पट वाढणारच. शेवटीं येन केन प्रकारेण कांहीं फंड गोळा करून तिंकोनेच्या पुलाजवळ नवी शाळा काढायचें पेपॉनेनें ठरविलें. हेतु हा कीं पीव्ह आणि ला रोका यांच्या मध्यावर हें ठिकाण असल्यामुळें दोन्ही वस्तींतील लोकांना आपलीं मुलें तेथें पाठवणें सोयीचें व्हावें. पण इथेंहि प्रश्न अधिकच गुंतागुंतीचा व कांटेरी बनला !

" तें सर्व ठीक आहे हो ! " ला रोकांतील लोक म्हणूं लागले, " शाळा पुलाजवळ आमच्या बाजूला असली म्हणजे झालं. "

" पुलाजवळ शाळा येत आहे हें छान ! अगदीं उत्तम ! " पीव्हचे लोक म्हणाले, " पण शाळा आमच्याच बाजूला झाली पाहिजे ! "

अगदीं कांटेकोरपणानें पाहिल्यास दोघेहि चूक होते. ( तुम्हाला तसें म्हणणें अधिक पसंत असल्यास बरोबर होते म्हणा हवें तर ! ). कारण, अगदीं शाळे-करितां मधोमध ठिकाण काढावयाचें म्हटल्यास तें पुलाच्या या किंवा त्या बाजूस न पडतां पुलाच्या मध्यावरच पडत होतें !

दोन्ही गांवांतील शिष्टमंडळांशीं बराच वेळ चर्चा झाल्यानंतर पेपॉने ओरडला : " अरे, तुम्हाला काय पुलाच्या मध्यावर शाळा हवी आहे, होय ? "

" आपण मेयर आहांत. " त्यांनीं उत्तर दिलें, " आपणच या बाबतींत न्याय्य निर्णय दिला पाहिजे. "

" तुम्हा सर्वांना त्या पुलावर न्यायचें, तुमच्या गळयाभोंवतीं मोठमोठे धोंडे बांधायचे आणि तुम्हाला खालीं पाण्यांत फेंकून द्यायचें हा एकच या बाबतींत खरा न्याय्य मार्ग आहे, " पेपॉने म्हणाला. आणि हें म्हणणें फारसें गैरहि नव्हतें.

" शें- पन्नास यार्ड इकडे कीं तिकडे असा हा प्रश्न नाहीं, " लोक त्याला सांगू लागले, " हा सामाजिक न्यायाचा प्रश्न आहे. " हें म्हणतांच मेयरसाहेब अगदीं चुप झाले. ' सामाजिक न्याय ' हा शब्द-प्रयोगच असा होता कीं तो कानीं पडतांच पेपॉने जरा सांवरूनच बसे ! जणुं कांहीं विश्वनिर्मितीचा चमत्कारच आपण पहात आहोंत असा त्याला भास होई !

मध्यंतरीं परिस्थिति अधिकाधिक चिघळूं लागली. ला रोकामधलीं कांहीं मुलं रात्रीच्यावेळीं पुलावर गेलीं. आणि पुलाच्या मधोमध त्यांनीं एक लाल रेषा रंगवून ठेवली; व पीव्हमधील कोणीहि त्या रेषेपलीकडे आपल्या बाजूला रहाणेंच त्याच्या आयुरारोग्याच्या दृष्टीनें हितावह आहे, अशी त्यांनीं घोषणा केली. दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं पीव्हमधील मुलांनीं त्या लाल रेषेशीं समांतर अशी एक हिरवी रेषा आंखून ठेवली; आणि ला रोकामधील प्रत्येकानें आपल्या घरींच रहाणें बरें असा इषारा दिला ! तिसऱ्या दिवशीं संध्याकाळीं दोन्हीं गांवांतलीं मुलें एकाच वेळीं पुलाच्या मध्यावर आलीं. ला रोकामधील मुलांपैकीं एकजण हिरव्या रेषेवर थुंकला आणि पीव्हमधल्या मुलांतला एकजण लाल रेषेवर थुंकला. झालें, पंधरा मिनिटांच्या अवधींत-च तीन मुलें खालीं नदींत गटंगळया खात असलेलीं आढळून आलीं ! पांच जणांना तर डोक्याला गंभीर स्वरूपाच्या जखमा झाल्या होत्या. तथापि खेदाची गोष्ट म्हणजे नदींत पडलेल्या तीन मुलांपैकीं दोघे पीव्हचे होते आणि फक्त एकच ला रोकाचा होता. यामुळें सारखा ' स्कोअर ' होण्याच्या दृष्टीनें ला रोकाच्या एका मुलाला नदींत फेकणें आवश्यक झालें ! डोक्याला जखमा झालेल्या पांच मुलांपैकीं तिघे ला रोकाचे आणि दोघे पीव्हचे होते. त्यामुळें पीव्हच्या आणखी एका मुलाला ठोकून काढण्याची गरज निर्माण झाली ! अर्थात् हें सर्व सामाजिक न्यायासाठींच !

पुढें डोक्याला खोक पडणाऱ्या आणि नदींत फेंकल्या जाणाऱ्या मुलांची संख्या दररोज वाढूं लागली. लवकरच त्यांत तरुण, वृद्ध अशा मोठ्या माणसांच्या संख्येचीहि भर पडण्यास आरंभ झाला. नंतर एके दिवशीं पुलाजवळ टेहेळणी करण्यासाठीं घुटमळत राहणाऱ्या स्मिल्झोनें पेपॉनेला एक खरोखरीचीच वाईट बातमी सांगितली : " पीव्हची एक बाई आणि ला रोकाची एक बाई यांच्यांत आज गुद्दागुद्दी झाली ! "

आतां खरें म्हणजे अशा प्रकारच्या भानगडींत बायका पडूं लागल्या कीं कहरच होतो ! पति, बंधु, प्रियकर, पिता व पुत्र यांपैकीं कुणाच्याहि हातांत त्या बंदूक देतात. बायका म्हणजे राजकारणांतील प्लेगच ! आणि दुर्दैवानें जगांतील उद्योगांपैकीं पंचाण्णव टक्के उद्योग म्हणजे राजकारणाचाच ! यामुळें लवकरच सुऱ्या









अनुक्रमणिका

बाहेर निघाल्या. आणि बंदुकींच्या फैरी झडण्यास सुरुवात झाली.

" आतां कांहीं तरी केलेंच पाहिजे " — पेपॅाने म्हणाला, " नाहींतर शाळेऐवजीं आपल्याला कबरस्थानाचीच तरतूद करावी लागायची ! "

शाळेंतील खोलीपेक्षां थंडगार अशा थडग्यापासून शिकण्यासारखें कितीतरी अधिक असतें असें म्हटलें तर तें कांहीं वावगें नाहीं ! तथापि, हा कांहीं थट्टेचा विषय नव्हता. पेपॅानेंहि पण तो अत्यंत कौशल्यानें हाताळला. पुढेंच पो नदीच्या पात्रांत एक जुनी तरंगती पाणचक्की कित्येक वर्षे पडून होती. जहाजाच्या दोन जुन्या अडगळीच्या खोल्या, त्यांच्यामधोमध चक्कीचें चक्र आणि दोहोंना जोडणारें एक केबिन असा तो संच होता. पेपॅानेनें तो तिंकोनेच्या पुलाच्या मधल्या कमानीपर्यंत ओढीत ओढीत आणवला. आणि दोन्ही भाग एकत्र येतील अशा बेतानें तो पुलाला आधार देणाऱ्या मधल्या खांबांना सांखळीनें बांधवून कांठापर्यंत पोहोंचतील अशा फळया दोन्ही बाजूस टाकवल्या. आणि अशा प्रकारें नव्या तरंगत्या शाळेच्या उद्घाटनाचा मंगल समारंभ एके दिवशीं घडून आला ! समारंभाला मोठा जमाव हजर होता. त्यांत कांहीं शहरांतून आलेले पत्रकारहि होते.

पुढें नमूद करण्यासारखा एक अपघात घडून आला. तो म्हणजे तिसऱ्या इयत्तेंत सतत सहा वर्षे नापास झालेल्या बेलेटी नांवाच्या मुलानें एके दिवशीं आपल्या मास्तरांना पाण्यांत फेंकलें हा होय.

परंतु त्यामुळें पेपॅानेची मनःशांति ढळली नाहीं. " इटली भूमध्यसमुद्राच्या मध्यें आहे ", तो म्हणाला, " आणि पोहावें कसें हें प्रत्येकाला अवगत असावयास हवें."

---

# आपल्या अर्थव्यवस्थेमागील मूलभूत दृष्टिकोण

आपणांस आपल्या देशाचें उत्पादन व संपत्ति वाढवावयाची आहे, देशांत अधिकाधिक औद्योगीकरण करावयाचें आहे. मोठ्या प्रमाणावर मोठमोठे उद्योगधंदे काढल्याशिवाय व त्यांतून आधुनिकांतलें आधुनिक वैज्ञानिक तंत्र ( technique ) अवलंबिल्याशिवाय आपणांस आपली औद्योगिक प्रगति करून घेतां येणार नाहीं. उद्योगधंदे मोठेच असून उपयोगी नाहीं. ते सर्वत्र देशांत पसरले पाहिजेत. लोखंड व पोलादाचा कारखाना असो, रेल्वे एंजिनांचा कारखाना असो, सीमेंट, खतें, लष्करी साहित्य यांचे कारखाने असोत, यंत्रें तयार करणारे कारखाने असोत, — हे सर्व अगदीं आधुनिकांतले आधुनिक असले पाहिजेत.

दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे, आपल्या देशांत बेकारी असतां कामा नये. काम देणें हें केवळ आपलें कर्तव्यच नव्हे तर सामाजिक गरजहि आहे.

म्हणून दोन्हीहि गोष्टींचा आपणांस समन्वय साधावयाचा आहे. आधुनिकांतल्या आधुनिक 'टेक्निक'-चा अवलंब करतांना, त्यानें बेकारी निर्माण होऊं नये याकडे आपण लक्ष दिलें पाहिजे. इंग्लंडसारख्या देशांतून बेकारांना सरकार 'डोल'-( dole )-रूपानें मदत देत असतें. त्यांचें उत्पादनहि विपुल असतें. आपण एक कोट लोकांना 'डोल' देऊं म्हटलें तर तें आपणांस परवडणें शक्य नाहीं. शिवाय 'डोल' देणें अनिष्टच होय. 'डोल'पेक्षां काम देणेंच इष्ट; मग तें काम अधिक खर्चाचें ( uneconomical ) असेना का ! बेकारीनें निर्माण होणारा सामाजिक असंतोष टाळण्याकरितां, आपणांस काम वाढत्या प्रमाणांत देतां आलें पाहिजे.

त्या दृष्टीनें अंबर-चरख्यावर प्रयोग करून पाहणें चालूं आहे. अंबर-चरखे हजारों लोकांना दिले आहेत. त्यांपासून काय अनुभव येतो तो पाहणें उद्बोधक व व उपकारक होईल. आतांपर्यंत अंबर-चरख्यावरील प्रयोगांचें फलित पुष्कळच, अपेक्षेपलीकडे—आशाजनक आहे. — जवाहरलाल नेहरू ५ । १२ । १९५५

( कॅांग्रेस पार्लमेंटरी पक्षांपुढें केलेल्या भाषणांतून )








श्री. इंदुमती शेवडे

# आधुनिक चित्रकला

एक युरोपीय चित्रकार एकदां एक चित्र बऱ्याच रात्रपर्यंत रंगवीत बसतो. तो झोंपीं जातो त्या वेळीं तें ओल्या अवस्थेंत असतें. मध्यरात्रीं, एक मांजर त्याच्या खोलींत शिरून त्या चित्रावरून पलीकडे चालत जातें. अर्थात् चित्र ओलें असल्यामुळें, मांजराच्या पावलाचे ठसे त्यावर उमटून कुंचल्यानें करतां येणार नाहीं असें एक डिझाईन तयार होतें. दुसरे दिवशीं त्याचे चहाते तें चित्र पाहतात व एका अभिनव आधुनिक शैलीचा निर्माता म्हणून त्याच्या नांवें द्वाही फिरवितात. बिचारा चित्रकार! त्या मांजरीच्या पावलांनीं ही किमया केली होती.

## दुर्बोध पण अर्थशून्य नव्हे

वरील व्यंग्यकथा आधुनिक चित्रकलेवरील टीकावृत्तीचा एक मासला म्हणून देतां येईल. युरोपांत उगम पावलेली व आज सर्वत्र 'नवचित्रकला' ('Modern Art') या नांवानें ओळखली जाणारी चित्रकला ही आज एक विडंबनविषय बनली आहे. एवढेंच नव्हे तर, कलाक्षेत्रांत कधीं नव्हतें एवढें वाद व वादळ तिनें निर्माण केलें आहे. कला व सौंदर्य यांचा मूलभूत संबंध आहे काय? कलावंत कोणासाठीं रंगवितो? त्याच्या कलेचें कार्य काय? – इत्यादि प्रश्न नवचित्रकलेनें नव्यानें उपस्थित केले आहेत. कलाक्षेत्रांत आज चित्रनिर्मितिविषयक विचारसरणींत व दृष्टिकोनांत आमूलाग्र क्रांति झाली असून आजची चित्रकला ही सामान्यांच्या आवांक्याबाहेर गेलेली आहे. नवचित्रकलेबद्दल सामान्यतः ठराविक ठशाचे विनोद आपण मासिकांतून वाचतो. प्रदर्शनांत एकाद्या पिकासो, पॉल क्ली किंवा गगनेंद्रनाथ टागोर यांच्या चित्रासमोर उभे राहून प्रेक्षक म्हणतात: "हीच कां आमची चित्रकला? यापेक्षां तर माझी दहा वर्षांची पोर अधिक चांगलं काढते!"

अन् चुटकीसरशी बिचारा आधुनिक चित्रकार निकालांत निघतो! असे उद्गार काढणाऱ्यांत निव्वळ टवाळखोर टीकाकारांचा भरणा अधिक असला, तरी आधुनिक चित्रकला समजून घेण्याचा प्रयत्न करणाऱ्या कांहीं उत्सुक कलाप्रेमींचीसुद्धां हीच प्रामाणिक अडचण असते हेंहि तितकेंच खरें! आजचीं चित्रें त्यांना पाली-अर्धमागधीप्रमाणें वाटतात. असें कां? आजची चित्रकला ही खरोखरच अर्थशून्य रंगरेघोट्यांचा व दुर्बोध आकृत्यांचा 'पोरखेळ' झालेला आहे कीं काय? केवळ एक 'मनोविकृति' एवढीच तिची संभावना करतां येईल काय? कीं आजच्या चित्रकारांना ह्या दुर्बोध, विचित्र आकृत्यांतूनहि कांहींतरी सांगायचें आहे?

पण ज्या अर्थीं गेल्या अर्धशतकावर चित्रकलेंतील हा 'मनोविकृत पोरखेळ' चालू आहे, त्याअर्थीं, ब्लेकूचेंच इतरत्र उच्चारलेलें एक वाक्य टीकाकारांच्या तोंडावर टाकतां येईल कीं– "Only a wise man could so persist in his folly."! आधुनिक चित्रकलेविषयीं विचार करतांना एक महत्त्वाची गोष्ट प्रथम लक्ष्यांत घ्यायला हवी. ती ही कीं, टीकाकारांनीं 'मनोविकृति' म्हणून हेटाळलेला हा दुर्बोध 'गोंधळ' केवळ चित्रकलेच्या क्षेत्रापुरता मर्यादित नसून साहित्य, संगीत, शिल्प इत्यादि सर्व कलाक्षेत्रांत एकाच वेळीं, एकाच पद्धतीनें उद्‌भूत झालेला दिसेल. कोठल्याहि विशिष्ट कारणाशिवाय आपोआप अचानक घडलेली किंवा दहापांच कलावंतांच्या विक्षिप्त लहरीनें किंवा संगनमतानें एकाद्या ठिकाणीं निर्माण झालेली ही वावटळ नसून तर्कसिद्ध अशी एक विशिष्ट सामाजिक व ऐतिहासिक प्रक्रिया आहे. युरोप हें जगांतील कलाविषयक चळवळींचें क्रांतिकेंद्र. आधुनिक चित्रकलेचा इतिहास म्हणजे युरोपीय कलेचा इतिहास. युरोपीय कलेच्या या इतिहासाचें अवलोकन केल्यास असें दिसून येईल कीं, गेल्या पाऊण शतकांत कलाक्षेत्रांत जेवढ्या क्रान्त्या ('Art Revolutions')












युरोपांत झाल्या व जेवढे नवनवे संप्रदाय निघाले, त्या प्रत्येक संप्रदायाचें एक विशिष्ट तत्त्वज्ञान, त्यावर आधारित अशी विशिष्ट विचारप्रणाली, नवीं मूल्यें व नवें तंत्र होतें. आणि वाङ्मय, संगीत, इतर कला व शिल्प या प्रत्येक क्षेत्रांत त्यानुसार समांतर चळवळी झाल्या. आजच्या नवचित्रकारांचाहि एक विशिष्ट दृष्टिकोण, एक स्वतंत्र तत्त्वज्ञान आहे व आज त्यांची कला आपल्याला कितीहि ' दुर्बोध ' असली तरी ती ' अर्थशून्य ' म्हणून निकालांत काढतां येण्याजोगी नाहीं.

## सामान्यांपासून दूर गेलेली कला

वस्तुस्थिति अशी आहे कीं, आजची चित्रकला आम्हांला ' दुर्बोध ' वाटते, याचें कारण सामान्य माणसाची चित्रकलेशीं आज संपूर्णतया फारकत झालेली आहे. ही फारकत दुहेरी आहे. एका बाजूस सामान्य माणसाच्या जीवनांतून कलेचें झालेलें उच्चाटन व त्याचें कलाविषयक अज्ञान व दुसऱ्या बाजूस कला-क्षेत्रांत झालेली शास्त्रीय व तांत्रिक वाढ. युरोपीय कलेच्याच इतिहासावरून असें दिसून येईल कीं, ही फारकतीची प्रक्रिया गेलीं अनेक शतकें चालू आहे. मध्ययुगीन कालांत कला ही धर्माशीं निगडित होती. बायबलमधील कथा, खिस्ताच्या चरित्रात्मक कथा, किंवा संतकथा यांचीच निवड चित्रकार करीत असल्या-मुळें लोकांना त्या समजत. त्या वेळीं कलेचा एकमेव आधार म्हणजे धर्ममंदिरें ... पुढें सतराव्या शतकांत ग्रीक व रोमन पुरा-वाङ्मयाचा शोध लागल्यानंतर पुन-रुज्जीवन-( 'Renaissance' )-कालांत येशू खिस्त, मादोना किंवा खिस्ती संत जाऊन त्या ऐवजीं व्हीनस्, झ्यूज्, बाकस् व क्युपिड् ही मंडळी आली व बायबलची जागा इलियडनें घेतली. हें जुनें ग्रीक-रोमन-वाङ्मय फक्त कांहीं सुशिक्षित लोकांपुरतें मर्यादित होतें. सामान्यांना त्याचें ज्ञान नव्हतें. व तेव्हांपासूनच कलेची व सामान्यांची फारकत सुरूं झाली. आतां कला ही धर्ममंदिरांतच कोंडलेली न राहतां, राजेरजवाडे, सरदार-दरकदार, श्रीमंत व्यापारी लोक यांच्या महालांत वावरूं लागली होती. आतां कला सामान्यांची राहिली नसून फक्त विविक्षित वर्गच आतां कलास्वादाचा अधिकारी बनला. अमेरिकन् व फ्रेंच राज्यक्रांतीनंतरहि चित्रकलेचे विषय बदलले पण कला ही ' बूर्झ्वा ' लोकांच्याच क्षेत्रांत राहिली.

एकीकडून ही फारकत होत असतां प्रत्यक्ष कलेच्या क्षेत्रांत शास्त्रीय व तांत्रिक वाढ होत गेली. नवे रंग-सिद्धांत आले, पर्स्पेक्टिव्हच्या कल्पना बदलल्या. ' सौंदर्य ', ' कला ' इत्यादींच्या परिभाषा बदलल्या, नवीं प्रतीकें आलीं, वर्ण्यविषय बदलले. आज कलेच्या तांत्रिक व शास्त्रीय बाजूची इतकी वाढ झाली आहे कीं, रंग, रेषा व आकृति ह्या कलेंतील मुळाक्षरांची जरी लोकांना तोंडओळख असली, तरी कलावंतांची आजची आलंकारिक भाषा – परिभाषा त्यांना समजणें शक्य नाहीं. त्यांत नित्य नवीं प्रतीकें, नव्या परिभाषा, नव-नवीन कल्पनास्वरूपें ( imagery ) व नवे आकार ( forms ) यांची सतत भर पडत आहे व उद्यांचा कलावंत आपलें म्हणणें कोणत्या नवीन प्रतीकांत व नवीन आकृतींत अभिव्यक्त करील याचा नेम नाहीं. त्यामुळें आजची कला ही दुर्बोध व गुंतागुंतीची बनली आहे. एवढेंच नव्हे तर त्या दुर्बोधतेला एक प्रकारचें गूढ ('mystic') व चमत्कृतिपूर्ण ('magic') स्वरूप आलें आहे. इतकें कीं, नवचित्रकलेच्या एका संप्रदाया-(Surrealism) ला खरोखरच 'Magic Realism' असें नांव आहे.

आजची कला ही सामान्यांपासून फार दूर गेली असली, तरी, " Art is the product of its time, " हें प्रमेय जर आपण मान्य केलें, तर आजच्या चित्रकारांनाहि कांहींतरी सांगायचें आहे. आजच्या कलेंतील दुर्बोधता व गुंतागुंत ही आमच्या यंत्रयुगीन, मानवताशून्य, गुंतागुंतीच्या जीवनाचें प्रतिबिंब आहे, हें ओघानेंच आलें. म्हणून ती समजून घेण्यासाठी आजच्या चित्रकलेच्या भाषा-परिभाषा, नवनवे प्रवाह व तिची तत्त्वप्रणाली अभ्यासणें आवश्यक आहे, हें उघड आहे.

## नवीन दृष्टि, नवीन आदर्श

आधुनिक चित्रकलेचा अभ्यास करतांना प्रथम प्रश्न उद्भवतात ते असे कीं, आधुनिक चित्रकला म्हणजे काय ? ती केव्हां अस्तित्वांत आली ? जुन्या आणि नव्या चित्रकलेंत मूलभूत भेद कोणता ? – ह्या प्रश्नांचीं उत्तरें देणें प्रथमदर्शनीं वाटतें तितकें सोपें नाहीं. ' जुनी ' व ' नवी ' असा भेद सुस्पष्टपणें ' इंप्रेशनिझम् ' पासून पडला, म्हणून ' इंप्रेशनि-










झम्' पासून चित्रकलेला 'आधुनिक' हें विशेषण वापरण्यांत येऊं लागलें. परंतु कांहींजण आजच्या अत्याधुनिक किंवा नवचित्रकलेला 'मॉडर्न आर्ट' असें नांव देतात. परंतु आधुनिक चित्रकलेचे (१) आधुनिक व (२) अत्याधुनिक किंवा नवचित्रकला असे दोन वर्ग पाडले तर ही अडचण दूर होते.

आधुनिक चित्रकलेचा उद्भव केव्हां झाला या बाबतींत इतिहासकारांचें ऐकमत्य नसलें तरी साधारणतः १८७० हें साल तिच्या जन्माचें मानण्यांत येतें. ह्या सुमारास एडवर्ड मॅनेट व त्याच्या समविचारी चित्रकारांनीं पॅरिसमध्यें भरविलेल्या एका प्रदर्शनांत मॅनेटचें समुद्रावरील सूर्योदयाचें "Une Impression" नांवाचें एक चित्र होतें. इतर चित्रांचीं नांवेंहि याच धर्तीवर होतीं. तें पाहून प्रसिद्ध फ्रेंच टीकाकार ज्यूल् क्लेअरटी यानें त्या प्रदर्शनाचें वर्णन "Salon des Impressionstes" असें केलें व तेव्हांपासून या नवीन चित्रकारांना 'इंप्रेशनिस्ट्स' असें संबोधण्यांत येऊं लागलें—व इंप्रेशनिझम्चा जन्म झाला. ग्रीक व रोमन तत्त्वपद्धतीवर आधारित जुनी 'क्लासिकल' चित्रकला व 'नवी' चित्रकला ह्यांतील भेद प्रथम डेलाक्रॉय, कूर्बे किंवा मिले या 'रोमॅंटिक्' चित्रकारांच्या चित्रांतूनच दिसूं लागला होता. ग्रीक व रोमन वाङ्मयानें, ऐतिहासिक किंवा पौराणिक विषय न घेतां, सामान्यांच्या दैनंदिन जीवनांतील सामान्य गोष्टींचीं चित्रें रंगविण्याचें हें 'वर्ण्यविषय-स्वातंत्र्य' घेऊन प्रथम त्यांनींच आधुनिक चित्रकलेचा पाया रोंवला. परंतु वर्ण्यविषयाखेरीज 'जुनी' कला व 'नवी' कला असे सुस्पष्ट भेद व त्या भेदाला आवश्यक असें शास्त्र व तंत्र हें पुढें 'इंप्रेशनिझम्'नेंच निर्माण केलें.

'जुनी' कला व 'नवी' कला यांत मूलभूत भेद कोणता ?—या प्रश्नाचें उत्तर असें कीं जुनी व नवी यांत मूलतः चित्र रंगविण्याचें तंत्र (Technique) किंवा कलाकौशल्य (Craftsmanship) यांत भेद नसून, मूलभूत भेद नवीन आदर्श, चित्रनिर्मिति-विषयक नवा दृष्टिकोन व नवे सिद्धांत यांचा आहे. वर्ण्य-विषयस्वातंत्र्याखेरीज 'इंप्रेशनिझम'चीं मुख्य तीन अंगें होतीं :- (१) कलानिर्मितिविषयक तत्त्वज्ञान, (२) नवीन दृष्टिसिद्धांत, (३) नवीन रंगसिद्धांत.

### यथार्थवाद्यांची 'मानवी दृष्टि'

'इंप्रेशनिझम्' हा चित्रकलेंतील यथार्थवाद. यथार्थवादाची मूळ कल्पना तत्त्वज्ञानाच्या प्रांतांतील आहे. मानवी ऐंद्रिय अनुभवाला एकादी वस्तु ज्या प्रकारानें प्रतीत होते, त्याशिवाय स्वतंत्रपणें तिच्या स्वरूपतः सिद्ध असलेल्या वैशिष्ट्याचा विचार करणें याला तत्त्वज्ञानांत 'रिॲलिझम्' म्हणतात. जगांतील दृश्य विषयांचीच निवड करून स्वतःच्या भावना विचारांत न घेतां केवळ वस्तुनिष्ठ चित्रण करणें म्हणजे यथार्थवाद. चित्रकलेच्या क्षेत्रांत पहिली विचारक्रांति घडून आली ती कॅमेऱ्यामुळें. इंप्रेशनिस्टांची विचार-सरणी अशी कीं, वस्तूंतील सत्य हें त्याच्या बाह्य स्वरूपां- (Visible Appearances)मध्यें असतें.—म्हणजे जसें दिसतें तसें हें खरें काय ? तसें असेल तर मग 'जसें दिसेल तसें' रंगविणें हेंच कलावंताचें ध्येय हवें व निसर्गाची हुबेहुब प्रतिकृति म्हणजे श्रेष्ठ कला हें प्रमेय मान्य करायला हवें. अर्थात् त्या दृष्टीनें मग कॅमेरा हा कलावंतापेक्षां अधिक श्रेष्ठ मानायला हवा. परंतु 'छायाचित्र' व 'कलाकृति' यांतील भेद एकाद्या अडाण्यालाहि कळण्याजोगा आहे. त्यामागें एकाची 'यांत्रिक दृष्टि' तर दुसऱ्याची 'मानवी दृष्टि' असा दृष्टिभेद आहे. कॅमेऱ्याप्रमाणें वर्ण्यवस्तूची छायाचित्री प्रतिकृति (Photographic Reality) निर्माण करणें ही एक केवळ यांत्रिकता. त्या-उलट, मानवी दृष्टीनुसार चित्रें रंगविणें ही खरी कला.

इंप्रेशनिस्टांच्या ह्या मानवी दृष्टीच्या विचारांतून त्यांचा दृष्टिसिद्धांत निघाला, तो असा : त्यांचें म्हणणें असें कीं माणसाची दृष्टि ही कॅमेऱ्याप्रमाणें कोणत्याहि दृश्यांतील डावा, उजवा, मागचा, पुढचा असा बारीक-सारीक तपशील (details) हा एकाच दृष्टिक्षेपांत पाहूं शकत नाहीं. कोणत्याहि दृश्यांतले मागचे किंवा पुढचे बारकावे निरखण्यासाठीं माणसाला आपली नजर त्यानुसार हालवावी लागते. एकाद्या चित्रांत छाया-चित्राप्रमाणें सर्व बारीकसारीक गोष्टी रंगविणें हें मानवी एकक्षेपी दृष्टी-(Instantaneous Vision) प्रमाणें चूक आहे. तसें रंगविणें फक्त अनेकक्षेपी दृष्टी-(Consecutive vision)-अनुसार शक्य होईल. सारांश, कॅमेऱ्याप्रमाणें चित्रें रंगविण्याऐवजी माणसाच्या एकक्षेपी दृष्टीनुसार जसें दिसेल तसें रंगविणें हेंच वास्तवाला धरून होईल, म्हणून छायाचित्राप्रमाणें बारीकसारीक तपशील रंग-विण्याची प्रथा जाऊन त्याऐवजीं प्रथमदर्शनीं एका



अनुक्रमणिका






दृष्टिक्षेपांत समोरची वस्तु जशी दिसेल तशी रंगविण्याची – म्हणजे त्या वस्तूचें ' Impression ' रंगविण्याची पद्धत सुरूं झाली. उदा० : एका निसर्गदृश्यांत समोर दिसणाऱ्या झोंपड्यांच्या किंवा माणसांच्या संपूर्ण बाह्यरेषा न काढतां फक्त दोनचार सूचक रेषांनीं त्या वस्तूंचा आभास निर्माण केला जातो.

इंप्रेशनिस्टांची आणखी एक महत्त्वाची कामगिरी म्हणजे त्यांचा रंगसिद्धांत. हा सिद्धांत त्यांनीं निळा, पिंवळा व लाल ह्या तीन प्राथमिक रंगांवर ( Primary colours ) न बसवितां, इंद्रधनुष्यांतील सप्तरंगांवर म्हणजे रंगावली-( spectrum ) मधील ' VIBGYOR ' ह्या रंगांवर आधारला. परिणामतः चित्रकाराचें ' पॅलेट ' आमूलाग्र बदललें. त्यावरील जुने गडद, मळकट रंग ( ब्राऊन्‌स व ब्लूज् ) जाऊन त्या जागीं सूर्यप्रकाश रंगविण्याचे हलके रंग आले. छाया-सिद्धान्त निघाले. पूर्वींचीं सकाळच्या अगदीं कोंवळया किंवा संध्याकाळच्या फिकट उन्हाचीं चित्रें रंगविण्याची पद्धत जाऊन, त्या जागीं प्रखर सूर्यप्रकाशाचीं, विविध-रंगांनीं नटलेलीं निसर्गदृश्यें काढण्याकडे कलावंतांचा ओढा होऊं लागला; व भडक, अमिश्रित प्रत्यक्ष रंग चित्रावर घालण्याची पद्धत निघाली. सूर्यप्रकाशाचे रंगप्रयोग करण्याचें कांहीं चित्रकारांना इतकें वेड लागलें कीं असे ' प्रकाश'प्रयोग करणाऱ्यांचा Luminism (प्रकाशवाद ) हा एक उपपंथहि पुढें निघाला.

इंप्रेशनिझमूकालीन चित्रकारांत उत्साहाची व सर्जनशीलतेची एक नवी लाट उसळली व नित्य नवे प्रयोग करून पाहणाऱ्या चित्रकारांची एक मालिकाच निर्माण झाली. मोनेट, मॅनेट, कॅमिल, पिसारो, रेनो, डेगास, सिसले, स्युराट व सिग्नॅक इत्यादि प्रयोगशील कलावंतांनीं ही कला कळसाला नेली. परंतु पुढें लवकरच एका पिढीनंतर त्याची प्रतिक्रिया सुरूं झाली. पॉल सिग्नॅक व स्युराट यांनीं त्यांतील रंगसिद्धांतांतील तांत्रिकता कळसाला नेली. त्यांनीं Optical Mixture चा सिद्धांत काढला व त्यानुसार Divisionist Technique शोधून काढलें. हा सिद्धांत पूरक रंगां-( Complementary Colours ) वर आधारलेला असून चित्रांत दोन पूरक रंग परस्परांजवळ टाकून त्यांचें एकत्रीकरण प्रेक्षकाच्या दृष्टींत कांहीं अंतरावरून घडवून आणण्याचा प्रयत्न असतो. ह्या चित्रकारांच्या हातांत चित्रकला ही कला न राहतां भिन्न रंगप्रयोग करण्याचें एक निर्जीव शास्त्रीय तंत्र बनलें. त्यांची कला ही ' रंगीत छाया-चित्रण ' बनली. निव्वळ रंग हेंच त्यांच्या कलेचें साधन बनल्यामुळें वर्ण्यविषय ( subject-matter ), प्ररचन ( Design ) व आकृति ( pattern ) ह्यांना फांटा मिळाला. निसर्गाचीं भिन्न रूपें त्यांनीं रंगविलीं. पण त्यांच्या चित्रांत भावना किंवा विचार यांना थारा नव्हता.

## व्हॅन गाऊ, गोगॉं, सेझॉं

ह्या प्रतिक्रियेंतून व्हिंसेंट व्हॅन गाऊ, पॉल सेझॉं व गोगॉं या तीन चित्रकारांनीं आपापल्या नव्या वाटा शोधल्या. या वाटांनाच सामान्यपणें ' पोस्ट – इंप्रेशनिझम् ' असें नांव आहे. इंप्रेशनिझम् हें कॅमेऱ्या-विरुद्ध कलावंतानें उभारलेलें बंड. परंतु रंगतंत्राच्या चाकोरींतच त्यांची कला गुंतून पडल्यामुळें त्यांचा मूळ हेतु बाजूला राहिला. व ती अधिकाधिक स्थिर ( static ) बनली. इंप्रेशनिझमूच्या बाह्य सौंदर्य-पूजेला विटून तींतून बाहेर पडणारा पहिला कलावंत व्हॅन गाऊ. ' To paint Humanity ' हें त्याचें ध्येय होतें. वर्डस्वर्थ प्रत्येक दगडांत ' sermon ' वाचूं शकला, तर व्हॅन गाऊ याला प्रत्येक वृक्षांत व रोपट्यांत ' Soul ' आढळला. दुसरा बंडखोर पॉल गोगां. ... त्याचा विरोध तांत्रिक नसून तात्त्विक होता. त्याला एकंदरींतच साऱ्या युरोपीय यांत्रिक व बाजारू संस्कृतीचा वीट येऊन त्यानें ताहिती-बेटांतील असंस्कृत आदिवासी लोकांकडे धांव घेतली. " आपली संस्कृति रोगट, तर कलाहि रोगटच " असें तो म्हणे. " तिला शुद्ध, निरोगी, निरागस करायची असेल, तर लहान मुलें किंवा असंस्कृत आदिवासी लोकांप्रमाणें कलेची नव्यानें सुरुवात करायला हवी. " तिसरा प्रभावी चित्रकार पॉल सेझॉं. याला व्हॅन गाऊप्रमाणें ' आत्मशोधना'चेंहि वेड नव्हते व गोगांप्रमाणें ( 'unsophisticated simplicity' ) निरागस साधेपणाचाहि ध्यास नव्हता. परंतु त्याला निसर्गांतील प्रत्येक वस्तूच्या मूळ स्वरूपाचें आकृतीकरण करायचें होतें. त्यासाठीं त्यानें दगडधोंडे, पर्वत, घरें, माणसें, फळें-प्रत्येक वस्तूला स्तूप ( pyramid ), रंभ ( cylin-








der ), घन ( cube ), संक्षेत्र ( prism ) इत्यादि भूमितीय आकारांत आणून बसविलें. सेझांच्या समर्थ चित्रशैलींतून पुढें घनवाद ( cubism ) निघाला. व्हॅन गाऊच्या ' आत्मशोधना'वर व्यंजनवादी ( Expressionists) लोकांनीं आपला सिद्धांत बसविला. व गोगांच्या शुद्धीकरणाच्या हव्यासांतून पुढें मातीसच्या मदतीनें ' पशुवाद ' ( फाविझम् ) निघाला.

### वास्तववादी संप्रदाय

एकीकडे इंप्रेशनिझम् व पोस्ट-इंप्रेशनिझम् तत्कालीन औद्योगिक क्रांतीनें निर्माण केलेल्या वास्तवजीवनाकडे पाठ फिरवून, आपल्या चित्रकलेच्या विश्वांत जीवनाची पळवाट शोधीत होते, तर दुसरीकडे या वास्तवजीवनांतील कटुतेला व असहायतेला धैर्यानें तोंड देवून तिलाच आपला कलाविषय बनविणाऱ्या वास्तववादी चित्रकारांचा एक संप्रदाय निघाला. तो म्हणजे वास्तववाद ( Naturalism ). १९ व्या शतकाच्या अखेरीस युरोपीय वातावरण प्रगति व औद्योगीकरण यांच्या आरोळ्यांनीं भरून गेलें होतें. डार्विनच्या उत्क्रांतिवादाच्या ' Survival of the fittest ' या सिद्धांताचा भांडवलशाहीनें विपर्यस्त उपयोग स्वतःच्या अधिकाराकडे करायला सुरुवात केली होती. त्यानुसार अर्थात् भांडवलदार ' श्रीमंत ' वर्गच स्वतःला सुखासीनपणें जगण्यास व 'गरीब'–जगण्याला नालायक अशा जनतेला, निःसंकोचपणें पिळून काढण्यास पात्र समजत होता. ह्या आत्मलक्षी हृदयशून्य स्वार्थांधतेला प्रौढोन-( Proudhon ) च्या ' Property is theft ' ह्या सिद्धांतानें हादरा दिला. दुसरा हादरा दिला मार्क्सच्या ' कॅपिटल 'नें. ह्या अशा वातावरणांत वास्तववाद निर्माण झाला व फोंफावला. त्यामुळें साहित्य व कला यांनीं औद्योगीकरणाची जीवनांतील अपरिहार्यता ओळखून त्याचे दुष्परिणाम, दलित जनतेचें जीवन, त्यांची पिळणूक, कामगार व मजूर हे कलेचे विषय बनविले.

जीवनांतील वास्तवाकडे पाठ न फिरवितां जसें असेल तसें स्वीकारण्याची वास्तववाद्यांची ही भूमिका आजच्या अत्याधुनिक कलेच्या बहुतेक साऱ्या संप्रदायांना पायाभूत बनली. आपली कला पलायनवादी न बनवितां समाजाभिमुख बनविण्याचें कार्य प्रथम वास्तववादानें केलें. कला बाह्य सौंदर्याच्या सुखापासून अधिक सखोल व शाश्वत अशा आत्मिक आनंदाकडे व निव्वळ ' करमणुकीं'पासून जीवनाभिमुखतेकडे वळली. मेक्सिकोंत सध्यां रिव्हेरा, ओरोझको व सिकेरॉस ह्या थोर कलावंतांच्या कलेंत प्रगट झालेला ' सामाजिक वास्तववाद ' ( Social Realism ) वरील वास्तववादानें प्रेरित झाला आहे.

१९ व्या शतकांतील सर्व क्षेत्रांतील वैज्ञानिक प्रगतीनें मानवाला शारीरिक सुखसोयी दिल्या, बुद्धीला उत्तेजित केलें, पण त्याचा आत्मा रिकामाच राहिला होता. व्यंजनवादा-( एक्स्प्रेशनिझम् )नें ती उणीव भरून काढायचा प्रयत्न केला. निर्जीव व सजीव वस्तूंचें चित्रण, राग, भीति, मत्सर, आनंद इत्यादि मानवाचे भावाविष्कार, किंवा भाववाचक पदार्थांचें विश्लेषण हे ( एक्स्प्रेशनिझमचे ) – व्यंजनवादाचे विषय होते. मध्ययुरोपांत या संप्रदायाचा विशेष प्रसार झाला. कॅनडिन्स्की, मार्क शेगेल, ग्राझ, कोकोश्का हे सुप्रसिद्ध चित्रकार ह्या संप्रदायाचे प्रणेते होत.

विसाव्या शतकाच्या पहिल्या दीड दशकांत, पहिल्या महायुद्धांपूर्वी युरोपीय वातावरण सर्व बाजूंनीं अस्वस्थ व अशाश्वत बनलें होतें. ही अस्वस्थता त्याकाळीं निघालेल्या व्होर्टिसिझम् , फ्युच्युरिझम् , फाविझम् , सरियालिझम् इत्यादि छोट्या छोट्या संप्रदायांतून प्रतिबिंबित होते. आज त्यांपैकीं बहुतेक नाममात्र राहिले असून फक्त क्युबिझम् ( घनवाद ), व्यंजनवाद व अतिवास्तववाद (Surrealism) हे तीन प्रमुख आहेत.

घनवाद ( cubism ) हा आजचा सर्वांत प्रभावी चित्रसंप्रदाय आहे. वस्तूंच्या मूलस्वरूपाकडे जाण्याच्या सेझांच्या प्रयत्नांतून हा भूमितीय चित्रसंप्रदाय निघाला. फ्रेंच कलावंत ब्रेक व स्पॅनिश कलाकार सुप्रसिद्ध पिकासो हे या संप्रदायाचे अध्वर्यु आहेत.

### आत्मनिष्ठ भावाविष्कार

फ्राइडच्या प्रसुप्त (sub-conscious ) मनाच्या सिद्धांताचा अतिवास्तववादा-( Surrealism ) नें आधार घेतला आहे. व मानवी मनाच्या प्रसुप्त भावना प्रकट होतील तशा चित्रित करायला सुरुवात केली आहे. पॉल क्ली, सल्वादोर दाली, मॅक्स अर्नस्ट हे या पंथाचे प्रणेते आहेत. अतिवास्तववाद,



अनुक्रमणिका





घनवाद व व्यंजनवाद किंवा अॅब्स्ट्रॅक्ट आर्ट हे आधुनिक चित्रकलेचे अत्याधुनिक संप्रदाय आहेत. यांनाच नवचित्रकला ( Neo-Modernism ) असेंहि टोपण नांव आहे. नवचित्रकलेनें आधुनिक चित्रकलेला आजचें 'विकृत' व गोंधळाचें स्वरूप दिलें आहे. वस्तुनिष्ठ संवाहनाऐवजीं आत्मनिष्ठ भावाविष्कार ही या नवनिर्मितीमागील प्रमुख प्रेरणा आहे. कलावंत कोणासाठीं कलेची निर्मिति करतो ? – हा एक मोठाच प्रश्न नवचित्रकलेनें उपस्थित केला आहे. कारण वरील संप्रदायांच्या शास्त्रीय क्लिष्टतेमुळें व तांत्रिक दुर्बोधतेमुळें व आत्मनिष्ठ अभिव्यक्तीमुळें आज एका कलावंताची भाषा दुसऱ्या कलावंतालाहि समजणें कठिण झालें आहे. त्यामुळें बऱ्याचशा 'अभिजात' कलेबरोबर त्यापेक्षां अधिक 'भारुड' खपलें जात आहे. तथापि, नवचित्रकलेनें समाजाचें लक्ष आपल्याकडे वेधलें आहे, एवढेंच नव्हे तर आपल्या समाजाचें आजचें अस्वस्थ, रोगग्रस्त व बाजारी जीवन तिनें प्रतिबिंबित केलें आहे.

युरोप हें आधुनिक चित्रकलेचें माहेरघर आहे. औद्योगिक व वैज्ञानिक संस्कृतीबरोबर जगांतील इतर भागांतहि या प्रवाहाचा शिरकाव झालेला आहे. भारतांतहि आधुनिक चित्रकलेचा प्रभाव दोन पिढ्यांपूर्वी अमृता शेरगिल, गगनेंद्रनाथ टागोर, रवींद्रनाथ टागोर व जेमिनी राय ह्या चार कलावंतांच्या कलेंत आढळून येईल. आजच्या पिढींतहि हेब्बर, जॉर्ज कीट, शियावक्स चावडा, गाडे, एम्. एफ्. हुसेन, न्यूटन डिसोझा, पळशीकर, लामा अंगारिका गोविंदा इत्यादि उदयोन्मुख चित्रकारांच्या शैलीवर तो झाला आहे. परंतु आपल्याकडे गाडे, हुसेन इत्यादि एकदोन अपवाद वगळले तर अत्याधुनिक नवचित्रकलेची पकड आपल्या चित्रकारांवर तेवढी नाहीं. त्यामुळें 'दुर्बोध' किंवा 'विकृत' हीं विशेषणें आपल्या इकडील चित्रकलेला सर्रास वापरलीं जात नाहींत. तरी दिवसेंदिवस नवचित्रकलेचा परिणाम वाढत्या प्रमाणावर असून नवीन पिढीवर तिचें विशेष आकर्षण आहे. कोणी सांगावें ? ... कदाचित् युरोपीय पुनरावृत्तीची ही सुरुवात असेल !

आधुनिक चित्रकलेचें उदाहरण म्हणून या लेखासोबत पिकासो व ब्लूम या चित्रकारांचीं दोन चित्रें दिलीं आहेत. त्या चित्रांचा आशय असा :

**'आरशासमोरील मुलगी' – पाब्लो पिकासो**

जगद्विख्यात् युरोपीय चित्रकार **पाब्लो पिकासो** याचें हें क्युबिस्ट शैलीचें चित्र. वस्तूच्या बाह्य-स्वरूपाचें विभिन्न सूचक आकारांत ( Significant forms मध्यें ) पृथक्करण करून त्या आकारसंबंधाचें स्वरूप– किंवा आंतलें सत्य म्हणा हवें तर–जाणण्याचा प्रयत्न करणें हा क्युबिझमूचा उद्देश. – चित्रांतील मुलीच्या शरीराचें हें असें एक पृथक्करण आहे. त्यांत मुलीच्या चेहऱ्याची अर्धी आरशांत प्रतिबिंबित झालेली डावी बाजू ही मुलीची स्वतःबद्दलची कल्पना आहे. एक शांत, कोमल व दूरस्थ व्यक्ति अशी. परंतु हें स्वरूप पाहणारा आरशांतला हा डोळा आंधळा दाखवला आहे. परंतु चेहऱ्याचा उजवा भाग व तिचें सारें शरीर हीं निसर्गांतील तिच्या अस्तित्वाचा हेतु सुचविणारीं आहेत. उदा०: पिकलेल्या सफरचंदासारखे दिसणारे तिचे स्तन, व प्रजननासाठीं बीजाची प्रतीक्षा करणारें तिचें आतुर उदर. सारें शरीर जणुं एका जिवंत, सळसळत्या रसानें ओथंबलेलें. मुलीच्या ह्या शरीर–पृथक्करणाद्वारें स्त्री-जीवनांतील सत्यदर्शनाचा एका प्रतिभावान् चित्रकारानें केलेला हा प्रयत्न आहे.

**'मिरवणूक' ( परेड ) :– पीटर ब्लूम**

अमेरिकन् चित्रकार **पीटर ब्लूम्** याचें हें एक साधें चित्र 'अतिवास्तववादा' – ( Surrealism ) चें उदाहरण म्हणून देतां येईल. यंत्रयुगाचे मानवी जीवनावर झालेले दुष्परिणाम व यांत्रिक संस्कृतीनें मानवी मनाचा केलेला कोंडमारा हा कित्येक अतिवास्तववाद्यांचा चित्रण-विषय आहे. यंत्र हें आज कांहीं मूठभर माणसांचें 'दैवत' व बाकीच्यांचें 'दैव' बनलें आहे. चित्राच्या पार्श्वभूमींत एका अजस्र यंत्र-राक्षसाचें चित्र आहे. त्यांत कितीतरी गुंतागुंतीची यंत्ररचना दाखविली आहे. या नीटस, भव्य व सामर्थ्यशाली दिसणाऱ्या यंत्रासमोर आजचा माणूस आपल्या यंत्र-पूर्व मध्ययुगीन शौर्याच्या व पराक्रमाच्या आठवणी डोक्यावर घेऊन मिरवीत आहे. उजव्या कोंपऱ्यांत असलेल्या माणसाच्या हातांतील दांड्याला बांधलेलें एक मध्ययुगीन शिरस्त्राण आहे. व पार्श्वभूमींतल्या यंत्रसमंधासमोर तें अगदीं विद्रूप व जुनाट दिसत आहे. माणसाचें सारें जुनें आज यंत्रयुगांत तसेंच दिसतें हें सांगण्याचा चित्रकाराचा उद्देश आहे.

‘ **Girl before the Mirror** ’

— Pablo Picasso



‘ **आरशासमोरील मुलगी** ’

— पॅब्लो पिकॅसो

( ब्लॉक ‘ नागपूर टाइम्स’च्या कृपेनें )

**‘ Parade ’**

— Peter Blum.



**मिरवणूक**

— पीटर ब्लूम

( ब्लॉक ‘ नागपूर टाइम्स’च्या कृपेनें )

डॉ. नारायण र. देशपांडे

# भारतीय राज्यशास्त्रपरिषदेचें १८ वें अधिवेशन

अखिलभारतीय राज्यशास्त्रपरिषदेचें १८ वें अधिवेशन यंदा भोपाळ येथें डिसेंबरमध्यें २१, २२ व २३ हे तीन दिवस भरलें होतें. अ. भा. राज्यशास्त्रपरिषदेचें यंदाचें अधिवेशन १८ वें असलें तरी अद्याप या परिषदेला इतर समाजशास्त्रविषयक परिषदांएवढें महत्त्व लाभलेलें नाहीं. याचें कारण भारतामध्यें विद्यापीठांतील अभ्यासक्रमांमध्यें राज्यशास्त्र या विषयास स्वतःचें स्वतंत्र असें स्थान अगदीं परवा-परवापर्यंत मिळालें नव्हतें. इतिहास किंवा अर्थशास्त्र यांपैकीं कोणत्या तरी एका विषयाशीं त्याची पोटशाखा या नात्यानें राज्यशास्त्र निगडित असे. त्यामुळें या विषयाच्या स्वतंत्र अभ्यासाला व विकासाला पुरेसा वावच मिळूं शकला नाहीं. याबद्दलच्या जाणीवेमधूनच अ. भा. राज्यशास्त्रपरिषद् जन्मास आली. आणि या परिषदेच्या कामामुळें व परिश्रमामुळें राज्यशास्त्र या विषयास भारतीय विद्यापीठांतून अलिकडे महत्त्व मिळूं लागलें आहे.

आज या देशापुढें ज्या अनेक राजकीय समस्या आहेत, त्यासंबंधीं योग्य सल्ला देऊन मार्गदर्शन करण्याचें काम राज्यशास्त्रपरिषदेसारख्या संघटनांचें आहे. पाश्चात्त्य देशांमध्यें आणि विशेषतः अमेरिकेमध्यें विद्यापीठें आणि संशोधनसंस्था या ठिकाणीं काम करणाऱ्या प्राध्यापकांच्या व संशोधकांच्या ज्ञानाचा व अनुभवाचा तेथील सरकार नेहमीं उपयोग करून घेत असतें. किंबहुना अशा तऱ्हेच्या व्यावहारिक उपयुक्ततेवर भर देऊनच तेथील संस्था काम करतात; व त्यामुळें तेथील विद्वान् 'अलिप्ततेच्या वलयां'त गुरफटून जात नाहींत. त्यांच्या अभ्यासाचा, संशोधनाचा व विद्वत्तेचा प्रत्यक्ष जीवनाशीं हरघडी संबंध येतो. दुर्दैवानें भारतामध्यें शासनव्यवस्था व शिक्षणसंस्था यांच्या परस्परसंबंधांत अशा तऱ्हेची परंपरा अद्याप रुजलेली नाहीं. नाहीं म्हणायला योजनासमितीचा कारभार सुरू झाल्यानंतर त्यामध्यें सहभागी होण्यासाठीं म्हणून अर्थशास्त्रज्ञांना आवाहन करण्यांत आलें ही गोष्ट या नव्या परंपरेची सुरुवात म्हणून निर्देशितां येईल. पण राज्यशास्त्राच्या अभ्यासकांचे बाबतींत अद्याप अशी परंपरा निर्माण व्हावयाची आहे. राजकीय प्रश्नांबाबत या देशांतील राज्यशास्त्राच्या अभ्यासकांच्या मताला विशेष महत्त्व मिळत नाहीं. आणि दुर्दैवानें अशा तऱ्हेचें महत्त्व स्वयंसिद्धपणें प्रस्थापित करण्याइतक्या उच्च दर्ज्याचे राज्यशास्त्रज्ञहि भारतामध्यें आज तरी फारसे नाहींत. आणि राज्यशास्त्रपरिषदेच्या कामकाजाला अलिकडे जें गटबाजीच्या राजकारणाचें अनिष्ट वळण लागूं पहात आहे, त्यामुळें या देशांतील राज्यशास्त्राच्या अभ्यासकांचा दर्जा वाढण्याच्या दृष्टीनें या परिषदेचें काम कितपत प्रभावी ठरेल याबद्दल शंका वाटते.

यंदाचें राज्यशास्त्रपरिषदेचें अधिवेशन भोपाळ-सरकारनें बोलाविलें होतें. पूर्वीं म्हैसूर, जयपूर वगैरे पूर्वीच्या हिंदी संस्थानांत या परिषदेचीं अधिवेशनें भरलीं होतीं. त्या वेळीं संस्थानी पाहुणचाराचा दरबारी अनुभव प्रतिनिधींना मिळाला. भोपाळ हें आतां स्वतंत्र संस्थान नसलें, तरी पाहुणचाराची परंपरा अद्याप नष्ट झाली नसल्यामुळें त्याच अगत्यानें भोपाळ-सरकारच्या शिक्षणखात्यानें परिषदेच्या प्रतिनिधींचें स्वागत केलें. परिषदेचे स्थानिक चिटणीस डॉ. श्रीवास्तव व भोपाळ-शिक्षणखात्याचे प्रमुख यांनीं सतत परिश्रम करून परिषदेचें काम यशस्वीपणें पार पाडण्यासाठीं सर्व व्यवस्था केली. भोपाळ हें शहर मध्यरेल्वेच्या मुख्य रस्त्यावर असल्यामुळें सोयीचें आहे. शिवाय निसर्गरम्य असें हें ठिकाण असल्यामुळें भावी मध्यप्रदेशाची राजधानी म्हणून भोपाळची झालेली निवड अत्यंत योग्य झाली असेंच परिषदेला जमलेल्या प्रतिनिधींचें मत पडलें.

परिषदेचा कार्यक्रम जरी २१, २२ व २३ डिसेंबर अशा तीन दिवसांचा आखला होता, तरी प्रत्यक्ष काम पहिल्या दोन दिवसांतच उरकलें. दि. २३ ला बहुतेक प्रतिनिधी सांचीला जाऊन तेथील बुद्धशिष्यांचीं स्मारकें व विहार पाहून आले. परिषदेच्या मुख्य कार्यक्रमाची सुरुवात दि. २१ ला सकाळीं ११ वा. झाली. प्रथम भोपाळसरकारचे मुख्य मंत्री डॉ. शर्मा यांनीं स्वागतपर भाषण केलें. ते स्वतः चार वर्षांपूर्वीपर्यंत शिक्षकपेशांतच काम करीत असल्यामुळें शिक्षक-प्रशासक या दुहेरी अनुभवांतून त्यांनीं राज्यशास्त्रपरिषदेसारख्या संघटनांच्या कामाचें महत्त्व वर्णिलें आणि परिषदेच्या प्रति-







निधींचें स्वागत केलें. आग्रा-विद्यापीठाचे कुलगुरु येऊं न शकल्यामुळें त्यांचे ऐवजीं भोपाळचे चीफ् कमिशनर श्री. भार्गव यांनीं परिषदेचें उद्घाटन केलें. श्री. भार्गव हे जुन्या जमान्यांतील सनदी नोकरांपैकीं एक अनुभवी प्रशासक असल्यामुळें त्यांचें भाषण मुद्देसूद व रेखीव झालें. परिषदेच्या यंदाच्या अधिवेशनामध्यें ज्या विषयांवर चर्चा व्हावयाची होती त्या सर्व विषयांचा अगदीं थोडक्यांत परामर्श घेऊन श्री. भार्गव यांनीं यंदाच्या अधिवेशनाच्या कार्यास सुरुवात केली. विशेषतः पंचवर्षीय योजनेंतील राज्यकारभारविषयक अडचणींचा त्यांनीं स्वतःच्या अनुभवांच्या संदर्भांत थोडा ऊहापोह केला.

राज्यशास्त्रपरिषदेच्या यंदांच्या अधिवेशनाचे अध्यक्ष सागर-विद्यापीठांतील राज्यशास्त्र-विभागाचे प्रमुख डॉ. सुशीलचंद्र सिंग हे होते. त्यांनीं आपल्या अध्यक्षीय भाषणामध्यें अमेरिका, भारत व राष्ट्रकुटुंब यांच्या परस्परसंबंधांबद्दलचे आपले विचार व्यक्त केले. अमेरिकेबद्दल भारतामध्यें पसरलेले गैर-समज दूर करून अमेरिकन् सरकारचें धोरण हेंच खरोखर कसें लोकशाही, स्वातंत्र्य व प्रगति यांना पोषक आहे हें दाखविण्याचा डॉ. सिंग यांनीं प्रयत्न केला. अमेरिकेच्या गेल्या दीडशें वर्षांच्या इतिहासांतील कांहीं घटना व अमेरिकन् पुढाऱ्यांचीं कांहीं विधानें यांचा आधार देऊन अमेरिकेच्या धोरणांतील सुसंगति त्यांनीं दाखविली. संयुक्त-राष्ट्रसंघटनेच्या प्रस्थापनेंत अमेरिकेनें पुढाकार घेतला. लायबेरीया, फिलिपाइन्स् यांच्या स्वातंत्र्याबाबत अमेरिकेनें आपल्या उद्घोषित धोरणाप्रमाणें कृति केली. अतिपूर्वेकडील राज-कारणामध्यें अमेरिकेनें जो भाग घेतला त्याच्या मुळाशीं सत्तेची अभिलाषा अगर वसाहतशाही वृत्ति नव्हती. १९२८ सालीं केलॉग – ब्रियॉं – करार करून आंतरराष्ट्रीय संबंधांतून युद्धाचें उच्चाटन करण्याचा अमेरिकेनें प्रयत्न केला. आंतरराष्ट्रीय राजकारणामध्यें अमेरिकेनें प्रादेशिक महत्त्वाकांक्षा केव्हांहि बाळगली नाहीं. उलट, इंग्लंडच्या वसाहतवादी वृत्तीला पायबंद घालण्याचेच प्रयत्न रुझवेल्टप्रभृति अमेरिकन् पुढाऱ्यांनीं केले आहेत. याप्रमाणें डॉ. सिंग यांनीं अमेरिकेचें धोरण स्वातंत्र्य, समता व विकास यांना पोषक असल्याचें दाखवून दिलें. अमेरिकेच्या धोरणांत कांहीं गौण भागहि आहे, असें सांगतांना त्यांनीं अमेरिकेंत रेड इंडियन व नीग्रो लोकांना मिळालेल्या वागणुकीचा निर्देश केला. दक्षिण अमे-रिकेंतील राज्यांच्या अंतर्गत कारभारामध्यें ढवळाढवळ, डॉलर-मुत्सद्देगिरी, नैर्ऋत्य आफ्रिकेच्या किंवा दक्षिण आफ्रिकेंतील हिंदी लोकांच्या प्रश्नाबद्दल स्पष्ट भूमिका घेण्यास नकार, काश्मीर व गोवा या प्रश्नांबद्दल मुग्धता वगैरे अमेरिकेच्या परराष्ट्रीय धोरणांतील कांहीं दोष-स्थळें आहेत असें डॉ. सिंग यांनीं सांगितलें. परंतु अमेरिकेच्या परराष्ट्रीय धोरणांतील हीं निरनिराळीं गुण-दोषस्थळें दाखवून परिषदेच्या अध्यक्षांनीं निश्चितपणें काय साधलें हें सांगतां येत नाहीं. अमेरिकेच्या धोरणा-संबंधीं बरें अथवा वाईट अशा कोणत्याच प्रकारचे निष्कर्ष प्रतिनिधींच्या मनावर डॉ. सिंग यांना बिंब-वितां आले नाहींत.

अध्यक्षांचा मुख्य रोख भारताच्या परराष्ट्रीय धोरणावर मुख्यत्वें तटस्थतेच्या किंवा सत्तागटांपासून अलिप्त राहण्याच्या धोरणावर टीका करण्याचा होता. अमेरिकेनें सुरवातीच्या काळांत अलिप्ततेचें धोरण अंगिकारलें असलें तरी चालू परिस्थितीमध्यें आंतर-राष्ट्रीय राजकारणाचें पुढारीपण अमेरिकेनें पत्करलें आहे, आणि जागतिक राजकारणाच्या सद्यःस्थितीमध्यें व विशेषतः भारताचें भौगोलिक स्थान लक्षांत घेतां भारताला तटस्थतेचें धोरण स्वीकारणें शक्य नाहीं, असें डॉ. सिंग म्हणाले. एवढेंच नव्हे, तर भारताचें धोरण खरोखर तटस्थतेचें नसून एका गटाशीं जास्त सहकार्य करावयाचें आहे व हें राष्ट्रहिताला विरोधी आहे असा डॉ. सिंग यांचा दावा होता. रशिया, चीन व इतर साम्यवादीं राष्ट्रें यांचेबरोबर अलिकडे वाढलेला भारताच्या संबंधांचा उल्लेख करून डॉ. सिंग यांनीं अशी तक्रार केली कीं, भारत साम्यवादी गटाला जास्त जवळ करीत असून दिवसेंदिवस अमेरिकेला विरोधी बनत चालला आहे. संयुक्त – राष्ट्रांमधील रशियाच्या अडवणुकीच्या धोरणाचें वर्णन करून त्या संघटनेमध्यें भारतानें महत्त्वाच्या प्रश्नांवर फारच थोड्या वेळां अमेरिकेला पाठिंबा दिला असेंहि डॉ. सिंग यांनीं सांगितलें. अगदीं अलीकडे संयुक्तराष्ट्रांच्या सनदेमध्यें दुरुस्ती करण्याच्या प्रश्नावर परिषद् बोलवावी या अमेरिकेच्या मताला भारतानें विरोध केला. या गोष्टी-








बद्दल डॉ. सिंग यांनीं बरीच नाखुषी व्यक्त केली आणि सनदेमध्यें दुरुस्ती करण्याची आवश्यकता प्रतिपादिली.

थोडक्यांत म्हणजे भारताचें धोरण साम्यवादी गटाला पोषक ठरत आहे, त्याऐवजीं अमेरिकेच्या धोरणाला तें पोषक असावें या मताचा अध्यक्षांनीं पुरस्कार केला. भारताच्या परराष्ट्रीय धोरणाबद्दल या देशामध्येंहि प्रामाणिक मतभेद आहेत व भारतानें पाश्चात्य गटाला अनुकूल असें धोरण स्वीकारणें हेंच भारताच्या हिताचें आहे असें आग्रहानें प्रतिपादणारे विचारवंतहि भारतामध्यें आहेत. परंतु राज्यशास्त्र-परिषदेच्या अध्यक्षांनीं आपल्या भाषणांत या विवाद्य प्रश्नाचा जो ऊहापोह केला तो तात्त्विक स्वरूपाचाहि नव्हता किंवा योग्य युक्तिवादावर आधारलेलाहि नव्हता. या प्रश्नाची त्यांनी केलेली मांडणी फारच उथळ वाटली. आणि विशेषतः आपल्या भाषणाच्या शेवटीं डॉ. सिंग यांनी राष्ट्रकुटुंबाबद्दल जें विवेचन केलें तें अगदीं पूर्व-ग्रहदूषित आणि अन्याय्य असेंच होतें. ' राष्ट्रकुटुंबाचे सभासद न राहतांहि ब्रम्हदेशासारख्या देशाला आर्थिक सवलती वगैरे मिळतात. लष्करी व राजनैतिक फायदे-सुद्धां राष्ट्रकुटुंबाचें सदस्यत्व न पत्करतां मिळूं शकतील तर मग ब्रिटिश राजसत्तेचा दुय्यमपणा कां स्वीकारा ? ' असा डॉ. सिंग यांचा सवाल ! राष्ट्रकुटुंबाच्या कांहीं प्रदेशामध्यें भारतीयांना समान वागणूक मिळत नाहीं; इंग्लंड अजून पोर्तुगालला आपला दोस्त समजतें; ब्रिटिश वसाहतीमध्यें चाललेल्या अत्याचाराबद्दल नेहरू कांहीं बोलत नाहींत आणि अशा रीतीनें राष्ट्रकुटुंबाच्या सदस्यत्वामुळें भारताला स्वमताचें स्पष्ट प्रदर्शनहि करतां येत नाहीं, रानटीपणा व वर्णविद्वेष यांचें प्रतीक असें राष्ट्रकुटुंबाचें वर्णन करून डॉ. सिंग यांनीं आपलें भाषण संपविलें. हें विवेचन केवळ भावनाविवश होऊन व पूर्वग्रहदूषित दृष्टीनें केलें, एवढेंच नव्हें तर तें राष्ट्रकुटुंबाच्या स्वरूपाबद्दलच्या अज्ञानावर आधारलें आहे, असेंच म्हणावें लागतें. एकंदरीनें यंदाच्या अध्यक्षांचें भाषण निराशाजनक झालें असें म्हणणें प्राप्त आहे.

**यं**दाच्या **अधिवेशनामध्यें** चर्चेसाठीं म्हणून ज्या विषयांची गेल्या वर्षीं निवड करण्यांत आली ते सहा विषय तीन गटांत विभागले होते. सामान्यतः राज्यशास्त्राच्या तीन प्रमुख शाखा म्हणून **राजकीय विचार किंवा तत्त्वज्ञान, राज्यघटना व शासन-व्यवस्था** आणि **आंतरराष्ट्रीय राजकारण,** या तीन क्षेत्रांपैकीं एकेक विषय चर्चेसाठीं निवडण्याचा प्रघात असतो. पण गेल्या वर्षीच्या अधिवेशनांत या प्रत्येक क्षेत्रांतील दोन या प्रमाणें सहा विषय यंदाच्या अधिवेशनासाठीं निवडले गेले. ते असे : ( १ ) **राज्यपुनर्रचना.** ( २ ) **पंचवार्षिक योजनेचे कारभार-विषयक प्रश्न.** ( ३ ) **भारताचे दृष्टीनें राज्याचीं उद्दिष्टें.** ( ४ ) **आधुनिक भारतांतील राज्यशास्त्र-विषयक विचार.** ( ५ ) **भारताचें परराष्ट्रीय धोरण.** ( ६ ) **शांततामय सहजीवनाचे प्रश्न.** आतांपर्यंतचा अनुभव असा कीं, परिषदेच्या तीन दिवसांत सामाजिक व सांस्कृतिक कार्यक्रमाला दिला जाणारा वेळ वगळतां, तीन विषयांच्याहि चर्चेला मिळणारा वेळ अगदीं अपुरा पडतो. निबंध पाठविणारांना सात ते दहा मिनिटांमध्यें आपल्या निबंधाचा सारांश सांगावा लागतो व त्या विषयावरील चर्चेत भाग घेणारांना तीन ते पांच मिनिटांत आपलें म्हणणें मांडावें लागतें. त्यामुळें कोणत्याहि निबंधाचें समग्र परीक्षण होऊं शकत नाहीं व कोणत्याहि विषयाची चर्चा समाधानकारक झाल्यासारखें वाटत नाहीं. त्यातून यंदा सहा विषय ठेवले आणि चर्चेचे दिवस दोनच. या दोन दिवसांत विषयांच्या चर्चेला फक्त सहा ते साडेसहा तास एवढाच वेळ मिळाला. त्यामुळें कोणत्याहि विषयाची चर्चा योग्य तऱ्हेनें होऊं शकली नाहीं. ज्या लोकांनीं निरनिराळ्या विषयांवर निबंध पाठविले होते त्यांपैकीं बरेचसे परिषदे-ला न आल्यामुळें इतरांना चर्चेत भाग घ्यायला ( २|२ मिनिटें का होईना ) वाव मिळाला एवढेंच त्यांतल्या त्यांत समाधान. सहा विषयांवर मिळून सुमारें चाळीस निबंध परिषदेला सादर करण्यांत आले होते. त्यांपैकीं निम्म्याहून जास्त भारताचें परराष्ट्रीय धोरण व शांतता-मय सहजीवन या विषयांवर होते. राज्याचीं उद्दिष्टें व पंचवार्षिक योजनेचे कारभारविषयक प्रश्न यांवर सर्वांत कमी म्हणजे दोनच निबंध आले होते.

**राज्यपुनर्रचना** हा विषय सध्या सर्वांच्याच जिव्हाळ्याचा. राज्यपुनर्रचनामंडळाचा अहवाल १० ऑक्टोबरला प्रसिद्ध झाल्यापासून या विषयाची देशांत सर्वत्र चर्चा चालू आहे. राज्यशास्त्रपरिषदेच्या अधि-








वेशनाच्या अगोदर एक आठवडाच या अहवालावर संसदेमध्यें चर्चा सुरू झाली होती. स्वाभाविकच इतक्या जिव्हाळ्याच्या प्रश्नावर राज्यशास्त्राच्या प्राध्यापकांच्या या परिषदेंत भरीव व विधायक चर्चा होईल, विचार-परिप्लुत व तर्कशुद्ध भाषणें होतील अशी अपेक्षा बाळगणें चूक नव्हतें. प्रत्यक्ष राजकारण करणाऱ्या कार्यकर्त्यांच्या हितसंबंधी व भावनात्मक टीकेऐवजीं, प्राध्यापकांकडून उच्च पातळीवरून व शास्त्रीयदृष्ट्या राज्यपुनर्रचनामंडळाच्या अहवालाचें परीक्षण ऐकायला सांपडेल या इच्छेनें ज्यांनीं राज्यशास्त्रपरिषदेची या विषयावरील चर्चा ऐकली असेल त्यांना निराशाच अनुभवावी लागली असेल. एक तर, या चर्चेला नियोजित वेळ सुद्धां पुरा मिळाला नाहीं. चर्चा सुरू असतांनाच मादाम सन् यत् सेन सांचीला जाण्यासाठीं त्या मार्गे येणार असल्यामुळें त्यांना पहाण्याची संधि मिळावी म्हणून चर्चा जवळजवळ सव्वा तास स्थगित ठेवली. उरलेल्या थोड्या वेळामध्यें ज्यांना कांहीं मत मांडावयाचें होतें त्यांना दोनदोन मिनिटें वेळ देण्यांत आला. अशा परिस्थितींत कोणालाहि या प्रश्नावरील आपले विचार ओझरते सुद्धां मांडण्याला अवसर मिळाला नाहीं.

परिषदेसाठीं जे निबंध पाठविले होते परंतु जे वाचले गेले नाहींत त्यांपैकीं कांहीं निबंध विशिष्ट प्रदेशांतील संबद्ध-प्रश्नांबद्दल होते. त्या त्या प्रश्नांबद्दल पुष्कळशी नवी माहिती व नव्या कल्पना देण्याचे दृष्टीनें हे निबंध खरोखरच उपयुक्त ठरतील. ओरिसाच्या प्रश्नावर कटक येथील प्रा. दाश यांनीं निबंध पाठविला होता. त्यामध्यें ओरिसाच्या आणि भाषावार प्रांत-चळवळीच्या प्रश्नांची ऐतिहासिक पार्श्वभूमि सविस्तरपणें देऊन त्यांनीं ओरिसाच्या सध्याच्या मागणीचा साकल्यानें विचार मांडला आहे. राज्यपुनर्रचना-मंडळानें ओरिसाच्या मागणीचा योग्य तो विचारहि केला नाहीं आणि बिहार-ओरिसा-संबंधींच्या प्रश्नांबाबत मंडळाचे अध्यक्ष फाझल अली हे तटस्थ राहिले, या गोष्टींबद्दल दाश यांनीं तक्रार केली आहे. या न्यायानें त्यांनीं व कुंझरू यांनीं उत्तर प्रदेशाबाबत तटस्थ रहायला पाहिजे होतें असें दाश यांचें म्हणणें. मिदनापूरबद्दल ओरिसाची मागणी न्याय्य असूनहि आणि केवळ नैर्ऋत्य-मिदनापूरचीच मागणी ओरिसानें मंडळापुढें केली असतांनाहि मंडळानें ओरिसाला न्याय दिलेला नाहीं अशी प्रा. दाश यांची तक्रार आहे. त्यांनीं आपल्या निबंधामध्यें एक कायदेशीरपणाबद्दलचा मुद्दा उपस्थित केला आहे. ओरिसाबद्दलची पूर्ण माहिती असलेले फाजल अली हे एकच सदस्यमंडळांत होते. त्यांनीं बिहार-ओरिसा वादांतील प्रश्नांवर मत व्यक्त न केल्यामुळें या प्रश्नांवरील मंडळाचा अहवाल हा खरोखरच मंडळाचा असा अहवाल होऊं शकत नाहीं असा प्रा. दाश यांचा दावा.

आसामांतील डोंगराळ प्रदेशराज्याबद्दल गोहत्तीच्या डॉ. वेंकटराव यांनीं सादर केलेला प्रबंध माहितीपूर्ण होता. या डोंगरी प्रदेशांत स्वतंत्र राज्याची मागणी कां उद्भवली याची कारणपरंपरा देतांना डॉ. राव यांनीं आसामच्या सध्यांच्या राज्यकर्त्यांच्या ठिकाणीं असलेला मुत्सद्देगिरीचा पूर्ण अभाव हें याचें मुख्य कारण असल्याचें सांगितलें. बार्डोलाय यांचे निधनानंतर आसामला योग्य नेतृत्व न लाभल्यामुळें सध्यांच्या अडचणी निर्माण झाल्या आहेत असें राव म्हणतात. डोंगरी लोकांवर आसामी भाषेची सक्ति, त्यांच्या जिल्हामंडळावर बिगर-डोंगरी लोकांची नेमणूक, त्यांच्या विकासयोजनांबाबत दिरंगाई इत्यादि चुकीच्या कृत्यांमुळें स्वतंत्र राज्याची मागणी पुढें आली. हें स्वतंत्र राज्य भौगोलिक, आर्थिक, सामाजिक वगैरे सर्व दृष्टींनीं कसें अव्यवहार्य आहे हें दाखवून या प्रश्नावर उपाय म्हणून डॉ. वेंकटराव यांनी राज्यघटनेच्या ६ व्या परिशिष्टाची योग्य दुरुस्ती सुचविली आहे आणि या दुरुस्तीचा तपशीलहि त्यांनीं सविस्तरपणें दिला आहे.

लखनौ-विद्यापीठांतील प्रा. मसलदन यांनीं या राज्य-पुनर्रचनेच्या प्रश्नावर दोन निबंध पाठविले होते. त्यांपैकीं एकामध्यें त्यांनीं सध्याच्या राज्याचा बनाव कसा होत आला त्याचा ऐतिहासिक विकास संकलित केला आहे. दुसऱ्या निबंधामध्यें भाषावार प्रांतांना पर्याय म्हणून उपप्रांतांच्या योजनेची त्यांनीं चर्चा केली. मॉंट्फर्ड-अहवालामध्यें या पर्यायाचा विचार केला होता, परंतु त्यामुळें फायद्यांपेक्षां तोटे अधिक संभवनीय म्हणून तो फेटाळण्यांत आला. त्यानंतर १९४६ सालीं सर बी. एन्. राव यांनीं या-








संबंधीं योजना मांडली होती. आणि मद्रासप्रांताचें उदाहरण घेऊन त्यांनीं त्याचा विचार केला. इंग्लंड-मध्यें ज्याप्रमाणें स्कॉट्लंडसंबंधींच्या प्रश्नाबद्दल तेथील प्रतिनिधींच्या मताला स्वतंत्र स्थान व महत्त्व आहे, त्याप्रमाणें भारतांतील आसाम-सारख्या प्रांतांच्या कारभारांत सुद्धां अशी कांहीं स्वतंत्र व्यवस्था करतां येईल काय, या दृष्टीनें बी. एन्. राव यांनीं विचार केला होता. त्याबद्दलची माहितीहि प्रा. मसलदन यांनीं आपल्या निबंधांत दिली आणि या दोन्ही प्रकारच्या योजनांचें गुणदोषविवरण करून त्यांतल्या त्यांत स्कॉट्लंडबाबत जी स्वतंत्र व्यवस्था इंग्लंडमध्यें आहे तशीच प्रांतांतून करणें श्रेयस्कर असें मत त्यांनीं प्रतिपादलें.

बिहारचे डॉ. वेदांतशास्त्री यांनीं राज्यपुनर्रचनेबद्दल शासनविषयक सोय पाहून देशाचे प्रादेशिक विभाग करणें हा एक पर्याय व युगोस्लाव्हियाच्या धर्तीवर सांस्कृतिक पायावर उपराष्ट्रगटांचे घटक बनविणें हा दुसरा पर्याय – असे संघराज्य बनविण्याचे दोन पर्याय वर्णन करून भारतांतील परिस्थितीच्या वैशिष्ट्यामुळें येथें युगोस्लाव्हियाप्रमाणेंच योजना करायला पाहिजे असें सांगितलें. आणि त्या दृष्टीनें भाषावार प्रांतरचना हाच एक योग्य मार्ग होय असें मत त्यांनीं प्रतिपादिलें.

परिषदेला सादर करण्यांत आलेल्या या निबंधां-शिवाय चर्चेमध्यें राज्यपुनर्रचनेच्या प्रश्नांबद्दल बऱ्याच वक्त्यांनीं त्रोटकपणें आपलीं मतें मांडलीं. परंतु नेहमीं-प्रमाणेंच या राज्यशास्त्रपरिषदेमध्येंहि असा अनुभव आला कीं, उत्तरेकडील लोकांच्या–विशेषतः उत्तर प्रदेशां-तील – या प्रश्नाचें गांभीर्य तितकेंसें ध्यानांत येत नाहीं. खुर्जा येथील प्रि. गुप्ता – जे पुढील वर्षासाठीं अध्यक्ष निवडले आहेत – त्यांनीं आपल्या भाषणांत राज्यपुनर्-रचना ही कल्पनाच चूक व अनिष्ट आहे, राज्यपुनर्रच-नामंडळाची नेमणूक ही नेहरूसरकारची घोडचूक आहे आणि यामुळें राष्ट्राच्या ऐक्याला बाध येईल असें मत व्यक्त केलें. मात्र उत्तरप्रदेशाच्या विभागणीबद्दल पणिक्कर यांनीं केलेल्या सूचनेमुळें त्यांना राग आलेला दिसला. त्या ठिकाणीं उत्तर प्रदेशाच्या एकात्मतेचे त्यांनीं गोडवे गायिले. – याखेरीज नेहमीच्या शासनविषयक अडचणींचा उल्लेखहि कांहीं वक्त्यांनीं केला. या चर्चे-मध्यें नवा असा कोणताच मुद्दा व्यक्त झाला नाहीं.

अधिवेशनापुढें चर्चेसाठीं राज्यशास्त्रपरिषदेनें जो दुसरा विषय योजला होता, तो **पंचवार्षिक योजनेच्या कारभाराबद्दलचा** होता. दुर्दैवानें शासनव्यवस्थेच्या आणि व्यावहारिकतेच्या दृष्टीनें हा विषय अत्यंत महत्त्वाचा असून यंदाच्या अधिवेशनामध्यें यावर मुळींच चर्चा झाली नाहीं. एक तर, विषय अनेक आणि वेळ थोडा. शिवाय या विषयाबद्दल ज्या दोन लोकांनीं निबंध पाठविले होते ते दोघेहि अधिवेशनाला न आल्यामुळें त्यांचे निबंध वाचले गेले नाहींत व त्यावर चर्चाहि झाली नाहीं. दोन्हीहि निबंध ओरिसांतील प्राध्यापकांचे होते. पुरी येथील प्रा. के. व्ही. राव यांनीं आपल्या निबंधामध्यें नियोजनामुळें निर्माण होणाऱ्या कारभारविषयक प्रश्नांची तात्त्विक चर्चा केली होती. विशे-षतः राज्यसंस्थेच्या ऐतिहासिक विकासामध्यें जी शासन-यंत्रणा निर्माण झाली ती नव्या परिस्थितींतील – व विशेषतः नियोजनावर भर देणाऱ्या – राज्यांचीं उद्दिष्टें कितपत साध्य करूं शकेल असा राव यांनीं प्रश्न उपस्थित केला. उदा०, भारतांतील सनदी नोकरांची यंत्रणा नव्या राज्याला कितपत पूरक व पोषक ठरेल ? नव्या राज्याच्या संदर्भांत प्रशासकाबद्दलची कल्पनाहि बदलणें जरूर आहे. नागरिकाला शासनव्यवस्थेच्या कार्यामध्यें जास्त भाग घ्यावा लागणार, आणि त्या दृष्टीनें राज्यकार-भाराला बहुसंख्य नागरिकांचें हार्दिक सहकार्य मिळणें आवश्यक आहे. या संदर्भांत भारतानें स्वीकारलेल्या लोकशाही पद्धतींतील कांहीं अडचणींचा राव यांनीं आपल्या निबंधामध्यें ऊहापोह केला आहे. संसदेमधील बहुमतवाल्या पक्षाला निवडणुकीमध्यें निर्विवाद बहुमत नाहीं; तीच गोष्ट राज्यविधिमंडळांची. या दृष्टीनें बहुसंख्य जनतेचें सहकार्य मिळविण्यासाठीं प्रातिनिधिक संस्थांच्या कार्यपद्धतीमध्यें सुधारणा होणें जरूर आहे. तसेंच कायदेमंडळाच्या सदस्यांना राज्याच्या निरनिरा-ळ्या कार्यक्षेत्रांबद्दल जास्त ज्ञान व अनुभव असणें जरूर आहे. विशेषतः राज्यविधिमंडळाबाबत याची उणीव विशेष जाणवते. अशा रीतीनें श्री. राव यांनीं कांहीं महत्त्वाच्या प्रश्नांकडे राज्यशास्त्राच्या अभ्यासकांचें लक्ष वेधलें. या निबंधावर चर्चा होणें आवश्यक होतें.

याच प्रश्नावर पण ओरिसाच्या संबंधांत प्रा. पटनाईक यांनीं एक निबंध धाडला होता. समाज-विकासयोजनांमुळें शासनव्यवस्थेची यंत्रणा व स्वरूप









अनुक्रमणिका

कसें बदलत आहे हें त्यांनीं दाखवून दिलें. या योजनांच्या परीक्षणासाठीं योजनासमितीनें नेमलेल्या खास यंत्रणेच्या अहवालामध्यें आतांपर्यंत दृष्टोत्पत्तीस आलेल्या दोषांचा निर्देश आहे. त्याकडे पटनाईक यांनीं परिषदेचें लक्ष वेधलें. जिल्हा – विकास – योजनेचा प्रमुख या नात्यानें कलेक्टरवरील जबाबदारी व काम फार वाढलें असून त्याला या कामांत साहाय्य करण्यासाठीं खास जिल्हा-विकास-अधिकाऱ्यांची स्वतंत्र नेमणूक करायला पाहिजे, असा पटनाईक यांचा आग्रह आहे.

**राजकीय तत्त्वज्ञान** या विभागाला अधिवेशनाच्या एकूण कार्यक्रमामध्यें फार थोडा वेळ मिळाला. भारताला लागू पडणारीं राज्याचीं उद्दिष्टें या विषयावर नांदेड येथील देवेंद्र वर्मा यांनीं निबंध धाडला होता. लोकशाहीचें ध्येय भारतानें स्वीकारलें असलें तरी तें सिद्ध करण्याच्या मार्गांत नोकरशाहीची मनोवृत्ति, एकपक्षाचें वर्चस्व या मोठ्या अडचणी आहेत. न्याय, समता, स्वातंत्र्य व बंधुभाव हीं इतर उद्दिष्टें साध्य करून घेण्याचे मार्गांतहि भारताला अडचणींना तोंड द्यावें लागेल. विशेषतः राज्यसंस्था सर्वंकष होण्याची भीति आहे. त्यासाठीं नागरिकांचें वैयक्तिक व नैतिक जीवन नियंत्रित करतां कामा नये, असा विचार वर्मा यांनीं मांडला. कलकत्त्याचे मुकर्जी यांनीं भारताच्या संदर्भांत समाजवाद व भांडवलशाही यांची मिश्र अर्थव्यवस्था – किंवा सामाजिक नियंत्रणाखालील भांडवलशाही या उद्दिष्टाचें विवेचन केलें. परंतु या विषयावर परिषदेमध्यें चर्चा झालीच नाहीं.

**' आधुनिक भारतांतील राजकीय विचार '** या विभागामध्यें अरविंदांच्या राजकीय तत्त्वज्ञानावर पाटण्याचे डॉ. वर्मा यांनीं दोन निबंध वाचले. मुझफरनगरचे सिन्हा यांनीं गांधींचे विचार व आचार यावर निबंध वाचला. रांचीचे सिन्हा यांनीं ' एम्. एन्. रॉय यांच्या राजकीय विचारांचें ऐतिहासिक परीक्षण ' या विषयावर निबंध वाचला. ते रॉय यांच्या राजकीय तत्त्वज्ञानावर विस्तृत प्रबंध लिहीत आहेत. अरविंदबाबूंचें तत्त्वज्ञान आणि राजकीय विचार यासंबंधीं डॉ. वर्मा यांचा बऱ्याच वर्षांपासून अभ्यास चालू आहे. अरविंदांच्या तत्त्वज्ञानविषयक सर्व लिखाणाचा अभ्यास करून ' राज्य ' या संस्थेबद्दलच्या त्यांच्या कल्पना डॉ. वर्मा यांनीं सूत्ररूपानें मांडल्या व पाश्चात्त्य विचारवंत-विशेषतः ध्येयवादी – आणि अरविंदबाबू यांच्या विचारांतील साम्यभेदांचें त्यांनीं विवेचन केलें. परंतु यांपैकीं कोणत्याच निबंधावर अधिवेशनामध्यें चर्चा झाली नाहीं. त्यामुळें राजकीय तत्त्वज्ञान-विभागाकडे दुर्लक्ष झालें म्हटल्यास फारसें चूक ठरणार नाहीं.

**भारताचें परराष्ट्रीय धोरण व शांततामय सहजीवन** हे दोन विषय वेगवेगळे होते. तरी ते इतके परस्परांशीं निगडित होते कीं या दोन्हीं विषयांवरील चर्चा ही खरोखर भारताच्या परराष्ट्रीय धोरणावरील चर्चाच ठरली. अध्यक्षीय भाषणामध्यें भारताच्या परराष्ट्रीय धोरणावर टीका होती. ' शांततामय सहजीवन ' या विषयावर मध्यप्रदेशाचे राज्यपाल डॉ. पट्टाभि सीतारामय्या यांनीं निबंध पाठविला होता. दोन्ही विषयांवर मिळून वीसपंचवीस निबंध आले होते. साहजिकच यंदाच्या अधिवेशनांतील चर्चेचा भर या विषयांवर पडला. अगदीं त्रोटक रीत्या या विषयांचा परामर्श या ठिकाणीं घेणें अशक्य आहे व तें अयोग्यहि ठरेल. स्वतंत्ररीत्याच या विषयाची चर्चा पुढें करण्याचें योजलें आहे.

**राज्यशास्त्रपरिषदेचें** १८ वें अधिवेशन अशा रीतीनें यंदा भोपाळ येथें झालें. पुढील वर्षी आंध्र-विद्यापीठातर्फे वॉल्टेर येथें अधिवेशन भरेल. उत्तर प्रदेशांतील खुर्जा येथील कॉलेजचे प्राचार्य व आग्रा-विद्यापीठाच्या कार्यकारी मंडळाचे सदस्य पी. डी. गुप्ता यांची अध्यक्ष म्हणून निवड झाली आहे. अमेरिकन् सरकारच्या नेतृत्व-कार्यक्रमातर्फे त्यांना अमेरिकेच्या दौऱ्यासाठीं शिष्यवृत्ति मिळाली असून ते तीन महिन्यांचा दौरा करणार आहेत. अध्यक्ष, चिटणीस, मासिकाचा संपादक – अशा या परिषदेंतील अधिकारांच्या जागा. त्या मिळविण्यासाठीं कांहीं कांहीं प्रतिनिधींची अधिवेशनाच्या सुरुवातीपासून खटपट सुरू असते. पुरेशीं मतें मिळविण्यासाठीं सभासद करावयाचे व बहुमताचे जोरावर आपल्या गटाचे प्रतिनिधी निवडून आणायचे अशा तऱ्हेचें ' सत्तेचें राजकारण ' राज्यशास्त्रपरिषदेमध्येंहि चालू असलेलें दिसतें. प्रादेशिक स्वरूपाच्या राज्यशास्त्रपरिषदा सुरू कराव्यात, अशा तऱ्हेची एक सूचना यंदा भारतीय राज्यशास्त्रपरिषदेपुढें विचारासाठीं मांडली गेली. एका दृष्टीनें भारतीय परिषदेच्या सध्याच्या कार्यपद्धतीबद्दल नापसंती दर्शविणारी विचारसरणीच या सूचनेच्या द्वारा व्यक्त झाली, असें कांहीं प्रतिनिधींना तरी वाटल्याशिवाय राहिलें नाहीं.



अनुक्रमणिका








# कै. त्र्यं. सी. ऊर्फ अण्णासाहेब कारखानीस :
# श्रद्धांजलि व विविध दर्शन

[ ' महाराष्ट्र-नाटक-मंडळी'चे एक संस्थापक व चालक, ' राजाचें बंड ' व ' स्वैरिणी ' या नाटकांचे कर्ते आणि नाट्यव्यासंगी लेखक म्हणून महाराष्ट्रांत प्रसिद्ध असलेले श्री. त्र्यं. सी. ऊर्फ अण्णासाहेब कारखानीस हे पुणें येथें ८ जानेवारी, १९५६ रोजीं आपल्या वयाच्या ८२ व्या वर्षी निधन पावले ! — ' नवभारता'शीं त्यांचे संबंध जिव्हाळयाचे होते. त्यांचें ' नवभारतां'तून प्रसिद्ध झालेलें लेखन वाचकांस सुपरिचित आहेच. गेल्या वर्षी १५ एप्रिल १९५५ रोजीं त्यांना ८२ वें वर्ष लागलें, त्या निमित्तानें ' नवभारता'च्या मे १९५५ च्या अंकांत श्री. के. नारायण काळे यांनीं त्यांच्यावर लिहिलेला वैशिष्ट्यपूर्ण लेख वाचकांस आठवत असेलच. — कै. अण्णासाहेबांशीं ज्यांचा जिव्हाळयाचा निकट संबंध आला होता त्यांच्यापैकीं कांहींच्या आदरांजली व आठवणी प्रस्तुत स्थळीं दिल्या आहेत. त्यांतून कै. अण्णासाहेबांच्या बहुविध व्यक्तिमत्त्वाचें लोभनीय दर्शन घडेल. — कै. अण्णासाहेबांच्या स्मृतीस सादर अभिवादन—— का. सं.]

## एका विकसनशील जीवनाची समाप्ति !

श्री. त्र्यंबक सीताराम कारखानीस यांच्या निधनानें महाराष्ट्रांतील एका थोर विचारी कलावंतांचा अस्त झाला आहे. श्री. कारखानीस यांना अण्णा अथवा अण्णासाहेब या नांवानें ओळखिलें जात असे. माझा त्यांचा प्रथम परिचय १९२२–२३ मध्यें झाला. असहकारितेच्या युगांत मी स्वत:चें महाविद्यालयीन शिक्षण सोडून महाड येथील राष्ट्रीय शाळेंत शिक्षकाचें काम पाहात होतों. अण्णासाहेबांनीं आपल्या दोनहि मुलांना सरकारमान्य शाळांतून काढून राष्ट्रीय शिक्षणासाठीं महाड येथें आणून ठेविलें. त्यामुळें अण्णासाहेबांचा व माझा स्वाभाविक संबंध आला. अण्णासाहेब हे मूळचे महाडचेच राहणारे असल्यामुळें त्यांचा मित्रपरिवार तेथें बराच मोठा होता. महाराष्ट्र-नाटक-मंडळींतून निवृत्त झाल्यानंतर ते महाडला कित्येक वर्षें येऊन जात असत. महाडला त्यांचा बराच मुक्काम होई. अशा मुक्कामांतून त्यांचा माझा स्नेह वाढत गेला. आणि त्यांच्या जीवनाचीं विविध अंगें जवळून पाहाण्याची संधि मला मिळाली. महाड येथें प्रथम जुळलेला स्नेहसंबंध सतत वाढत गेला आणि अखेरपर्यंत तो तसाच कायम राहिला होता, ही माझ्या आयुष्यांतील मोलवान् स्मृति आहे.

महाराष्ट्रांत, विशेषत: महाड वगैरे बाजूला ब्राह्मण आणि कायस्थ यांच्यामध्यें बरीच तेढ त्या वेळीं आढळे. महाराष्ट्रांतील कायस्थ प्रभु हे बुद्धीनें ब्राह्मणांच्या बरोबरीचे, क्वचित् श्रेष्ठहि असल्याचें दिसतें. ऐतिहासिक कालांतील त्यांची कामगिरी अशीच तेजस्वी आणि त्यागपरायण आहे. तथापि, जातिभेदांतील श्रेष्ठ–कनिष्ठतेच्या भावनेनें ब्राह्मण-प्रभूंत पुष्कळ मत्सर प्रकट होई. आगरकर-टिळकांच्या सामाजिक सुधारणाविषयक मतभेदामुळें महाराष्ट्रांतील सुशिक्षित वर्गांत तट पडले, तेव्हां कायस्थ-प्रभु जातींतील बहुतेक सुशिक्षितांनीं आगरकरांचा सुधारणावादी विचार स्वीकारिला. राजकारणांतील मवाळ-जहाल भेदांतहि पुष्कळ प्रभुमंडळी टिळकविरोधी झाली. माझ्यावर लहानपणींचे संस्कार सनातनी विचाराचे होते. सुधारक आणि सुधारणा यांच्याविषयीं माझे बरेच गैरसमज होते. आगरकर आणि टिळक या दोघांचेहि विचार अभ्यासल्यानंतर माझ्या मनांत समन्वयाची नवी दृष्टि निर्माण होऊं लागली. गांधीजींच्या असहकारयुगांत सामाजिक आणि राजकीय सुधारणाप्रवाहांचें उत्कटत्वानें मीलन झालेलें आढळल्यामुळें नवी दृष्टि दृढ होऊं लागली. अशा वेळीं अण्णासाहेबांचा स्नेह मला

फार उपकारक झाला. अण्णासाहेब हे स्वत: आगरकरांच्या सामाजिक सुधारणांचे पुरस्कर्ते असूनहि राजकीय दृष्ट्या टिळकांचे चाहाते व अभिमानी होते. महाराष्ट्र–नाटक–मंडळींत प्रो० भानू आणि श्री. काकासाहेब खाडिलकर यांच्यासारख्या विरोधी विचारकांच्या सहवासांत ते वागले आणि वाढले असल्यामुळें त्यांच्यांत व्यापक सहिष्णुता निर्माण झालेली होती. अण्णासाहेबांच्या संगतींत मला व्यापक राष्ट्रीयत्वाचा प्रथम अनुभव मिळाला. त्यांच्या मनांत चुकूनहि जातीयतेचा विचार येत नसे. अण्णासाहेबांचें हें वैशिष्ट्य मला त्या वेळीं अतिशय आकर्षक व आह्लादकारक भासलें. हें वैशिष्ट्य त्यांच्या अखेरच्या दिवसापर्यंत त्यांच्या ठिकाणीं टिकून राहिलें होतें. गांधीयुगांत हिन्दुमुसलमानांच्या तंट्यांतून पुढें जी नवी जातीयता निर्माण झाली तिचा देखील स्पर्श अण्णासाहेबांच्या मनाला कधीं झालेला मीं पाहिला नाहीं.

१९२७ मध्यें मी पुणें येथें टिळक महाविद्यालयांत अध्यापक म्हणून आल्यानंतर माझा आचार्य जावडेकरांशीं स्नेह जमला. जावडेकर हे आणखी एका नव्या दृष्टीचा प्रसार करीत होते. राष्ट्रवादी विचाराची परिणति समाजवादी विचारांत झाली पाहिजे अशी जावडेकरांची बैठक बनली होती. जावडेकरांच्या संगतींत या नव्या दृष्टिकोनानें सामाजिक प्रश्नांचा माझा पुनर्विचार चालू झाला. आणि या विचारमंथनाचे वेळीं अण्णासाहेब आमचे साथी बनले. त्यांच्या वयाच्या मानानें ते वास्तविक राष्ट्रवादीच राहावयाचे; पण त्यांचें मन सदैव तरुण असल्याचें आम्हांला यावेळीं स्पष्ट दिसून आलें. अण्णासाहेब, आचार्य जावडेकर आणि मी अशी आमची त्रयी कित्येक वर्षें झालेली होती. जावडेकरांजवळ मार्क्सचा विचार समजून घेण्यासाठीं अण्णासाहेब कित्येक महिने नियमानें येत असत आणि विद्यार्थ्यांप्रमाणें ग्रंथवाचन व शंकासमाधान चालत असे. पुढें अण्णासाहेबांनीं मार्क्सिझमचें स्वतंत्र बुद्धीनें कित्येक वर्षें अध्ययन चालू ठेविलें होतें व ते मार्क्सवादाचे पुरस्कर्तेहि झाले होते. अण्णासाहेबांच्या विकसनशील व्यक्तिमत्त्वाचें हें सुंदर निदर्शन म्हणतां येईल.

अण्णासाहेबांना विद्येचा व्यासंग करण्याची विलक्षण हौस होती. तरुणपणीं महाविद्यालयीन शिक्षण मध्येंच थांबवावें लागल्यामुळें त्यांची अतृप्त राहिलेली हौस त्यांनीं उद्योगांतून निवृत्त झाल्यानंतर पुरी करण्याचें ठरविलें. सुदैवानें दीर्घजीवन लाभल्यामुळें त्यांना आपली हौस भागवितां आली. आधुनिक काळांतील बहुतेक नवविचार त्यांनीं चांगले समजून घेतले होते. त्यांची स्व:तची प्रज्ञा चांगली प्रखर होती आणि बाळपणापासून समाजजीवनाचें अवलोकनहि त्यांनीं सूक्ष्मपणें केलेलें होतें. यामुळें नव्या नव्या वाचनानें त्यांच्या प्रतिभेला नवे नवे उन्मेष फुटत राहिले. खाजगी संभाषणांत, वादविवादांत त्यांचें हें वाढतें सामर्थ्य सदैव प्रत्ययाला येत असे. 'राजाच्या बंडा'नंतर त्यांच्या बौद्धिक जीवनांत जें प्रचंड परिवर्तन झालें, त्याचा पुरावा त्यांच्या 'स्वैरिणी'मध्यें पाहावयास सांपडतो. त्यांच्याजवळ चिकित्सक बुद्धि उत्तम तयार झालेली होती. तथापि, त्यांचा मुख्य भर कलात्मक निर्मितीवर होता. जीवनविषयक विविध प्रश्नांचें त्यांनीं चिंतन चालविलें होतें; पण तें चिंतन कलात्मक वाङ्मयांत व्यक्त झालें पाहिजे अशी त्यांची दृढ इच्छा होती. भारतीय जीवनांत आध्यात्मिक मूल्यांवर अतिरिक्त भर दिला गेल्यामुळें भारतीय तरुण-मनें स्वातंत्र्यानें कलानिर्मिति करूं शकत नाहींत, असें त्यांचें म्हणणें असे. म्हणून आपलें मन मूल्यकल्पनांच्या जाचांतून मुक्त करून घेण्याचा त्यांचा जोराचा प्रयत्न चाललेला असे. तात्त्विक दृष्ट्या त्यांना अध्यात्माचीं जीवनमूल्यें शेवटपर्यंत मान्य होतीं. तरी देखील मूल्यांची जाणीव स्वतंत्र-








पणें व स्वाभाविकपणें प्रत्येक व्यक्तीच्या जीवनांत जन्म पावली पाहिजे, असा त्यांचा रास्त आग्रह बनला होता. प्रबंधांतून वा निबंधांतून त्यांनीं आपले जीवन-विषयक अनुभव आणि विचार प्रकट करावे असें मी त्यांना नेहमीं सांगत असे. पण विमर्शात्मक लेखनाची त्यांना महति वाटत नसे. कलात्मक कृतींतूनच जीवनाचें खरें दर्शन परिणामकारक रीतीनें घडवितां येतें असा त्यांचा दृढ विश्वास होता. बौद्धिक वादविवादानें अथवा नैतिक उपदेशानें माणसांची स्वतंत्र विचार करण्याची शक्ति खुरटते असा त्यांचा मुख्य आक्षेप असे. जीवनांतील रस जागृत केल्याशिवाय जीवन प्रफुल्ल होणें शक्य नाहीं; हा जीवन-रस पांडित्यानें वा नैतिक आदर्शानें जागृत होण्याऐवजीं दडपला जातो असें अण्णासाहेब प्रतिपादीत असत. कलात्मक कृतींचें माध्यम हेंच केवळ जीवन-रसाला उन्मुक्त करण्याला उपयोगी पडतें असा त्यांचा विश्वास होता. म्हणून आपले सर्व विचार कलेच्या माध्यमांतून प्रकट करण्याची त्यांची धडपड होती. त्यासाठीं रवींद्रनाथ, शॉ, इब्सेन इत्यादींच्या कांहीं उद्बोधक कलाकृतींचा त्यांनीं मराठींत अनुवाद करण्याचें काम हातीं घेतलें होतें. आपलें कलात्मक आविष्करणाचें सामर्थ्य वाढावें या दृष्टीनें अभ्यास म्हणून या गोष्टी ते करीत असत. त्यांच्याजवळ अशा कार्याला लागणारी प्रतिभा मर्यादित होती, याचें त्यांना भान होतें. तरी देखील तपस्येनें गुणोत्कर्ष होऊं शकतो या सिद्धांतावर त्यांचा विश्वास असल्यामुळें त्यांनीं आपली तपस्या सतत चालू ठेवली होती. कलादेवीचा साक्षेपी उपासक या दृष्टीनें अण्णासाहेबांचें उत्तरचरित्र अतिशय लोभनीय म्हणावें लागेल. सवंग लोकप्रियतेचा त्यांना अतिशय तिटकारा होता. कलाक्षेत्रांत, विशेषत: नाट्यप्रदेशांत मौलिक कार्य व्हावें अशी त्यांची तीव्र तळमळ असे आणि त्या दृष्टीनें कोणी ध्येयदृष्टीचा माणूस त्यांच्याकडे गेला तर ते आनंदानें व उत्साहानें त्याला सर्व प्रकारचें साहाय्य व उत्तेजन देत असत. या वृत्तीमुळेंच काळे–वर्तकांच्या ' नाट्यमन्वंतरां'त त्यांनीं खूप लक्ष घातलें.

अण्णासाहेबांचें खाजगी जीवन अत्यंत शुद्ध होतें. निर्व्यसनी, नि:स्पृह, करारी जीवनाचा तो एक उत्तम नमुना होता. त्यांच्या घरीं त्यांच्या पत्नी थोर भक्तवृत्तीच्या व सेवापरायण असल्यामुळें त्यांच्या कौटुंबिक जीवनांत सदैव शांति व समाधान नांदत असे. त्यांचे चिरंजीव डॉक्टर आहेत; परंतु डॉक्टरीपेक्षां त्यांचें लक्ष ज्ञानेश्वरींतच अधिक आहे. विवाह-पाशांत न गुंततां आध्यात्मिक विकासांतच त्यांनीं आपलें मन रमविलेलें आहे. त्यांच्या तीनहि कन्या पदवीधर आहेत आणि आपला संसार सुखानें चालवीत आहेत. सौ. कुसुम नारगोलकर या आदिवासींच्या कार्यांत कित्येक वर्षें गुंतलेल्या आहेत हें महाराष्ट्राला माहीत आहेच. त्या अण्णासाहेबांच्या कन्या आहेत एवढें नमूद केलें म्हणजे पुरें. अण्णासाहेबांचा संसार चांगला यशस्वी झालेला, वयहि पुष्कळ झालेलें ( ८२ ), यामुळें त्यांच्या मरणाचें दु:ख करणें योग्य होणार नाहीं. त्यांनीं देखील मृत्यु अतिशय समाधानानें व शांतपणानें स्वीकारिलेला आम्ही पाहिला. त्यांच्या मरणानें एका थोर पुरुषाला महाराष्ट्र अंतरला याचा थोडा विषाद वाटणें स्वाभाविक आहे. ' नवभारता'शीं अण्णासाहेबांचा घनिष्ठ संबंध होता. त्यांचें लिखाण ' नवभारता'ला यापुढें मिळू शकणार नाहीं. त्यांच्या जीवनाचें व विचारांचें स्मरण हीच त्यांना उचित अशी श्रद्धांजली मानली पाहिजे.

— आचार्य स. ज. भागवत

---








# अण्णांच्या शब्दांत अण्णा

श्री. त्र्यं. सी. उपाख्य अण्णा कारखानीस यांच्या वयाला एक्याऐंशीं वर्षें पूर्ण झाल्याच्या निमित्तानें, मे १९५५ च्या 'नवभारत'च्या अंकांत मी "माझ्या माहितीचे अण्णा कारखानीस" या शीर्षकाचा एक लहानसा लेख लिहिला होता. आज श्री. कारखानीस यांच्याबद्दल लिहिण्याचा प्रसंग पुन्हां उपस्थित झाला आहे. मागच्या प्रसंगाप्रमाणें तो सुखावह मात्र नाहीं. ता. ८ जानेवारी, १९५६ रोजी श्री. अण्णा कारखानीस परलोकवासी झाले. त्या निमित्तानें हा लेख लिहिला जात आहे.

या लेखांत कै. कारखानीस यांच्याबद्दल मी स्वतः फार थोडें सांगणार आहे. स्वतः त्यांच्याच शब्दांतून त्यांच्या स्वभावाचे कांहीं पैलू वाचकांना विदित व्हावेत या दृष्टीनें त्यांच्या-माझ्या पत्रव्यवहारामधील त्यांच्या पत्रांतील कांहीं उतारे संकलित करून तीच श्रद्धांजलि त्यांच्या स्मृतीला मी वाहणार आहे.

हा पत्रव्यवहार सन १९२७ ते १९३२ या कालांतला आहे. १९३२ मध्यें 'नाट्यमन्वंतरा'-ची स्थापना झाली. १९३४ मध्यें मी स्वतःच पुण्यांत आलों. १९२७ च्या पूर्वी कांहीं दिवस श्री. कारखानीस यांचा माझा परिचय झालेला होता. १९२७ सालीं, कै. कृ. प्र. खाडिलकर यांचें 'सवती-मत्सर' हें नाटक महाराष्ट्र–नाटकमंडळीनें रंगभूमीवर आणलें. त्याच्या तालमींच्या निमित्तानें अण्णांचा मुक्काम दीर्घकालपर्यंत मुंबईत होण्याचा योग आला. या मुक्कामांत, श्री. केशवराव भोळे[१] व दाते यांचे स्नेही, नाट्यकलेचे व मराठी रंगभूमीचे अभ्यासू विद्यार्थी, व नवनाट्याचा सक्रिय पुरस्कार करण्याचा संभव असलेले तरुण या दृष्टीनें अण्णांना श्री. वर्तक, फाणेकर, मी वगैरे मंडळींबद्दल विशेष जिव्हाळा वाटे. स्वाभाविकच आमचें महाराष्ट्र-नाटकमंडळीच्या बिऱ्हाडीं वारंवार येणेंजाणें घडे. नाटकाच्या तालमींना उपस्थित राहण्याचीहि आम्हांला मुभा असे. कै. काकासाहेब खाडिलकर आणि अण्णा कारखानीस यांच्या नाट्य-शिक्षणपद्धतींचा प्रत्यक्ष आणि दृढ परिचय होण्याचा लाभ यामुळें सहजपणें आम्हांला झाला. श्री. कारखानीस यांच्या अंतःकरणांत कांहीं नव्या आशा-आकांक्षा उद्भवल्या. ते आमच्याकडे विशेष आपुलकीनें पाहूं लागले. मुंबईचा मुक्काम संपवून पुण्यास परत गेल्यावर ते लिहितात:—

"एक कृतज्ञ मन या पत्रानें आपलें मनोगत व्यक्त करण्याचा बरावाईट प्रयत्न करीत आहे. माझा मुंबईचा या खेपेचा मुक्काम प्रकृतीमुळें तर खराच, पण एरवींहि फार जाचक झाला असता. तुम्ही मंडळी तेथें नसतां व तुमच्या सर्वांच्या प्रेमळपणाचा मला लाभ न मिळता तर काय झालें असतें तें मनांत येतें व त्यामुळें तुम्हां सर्वांबद्दल कृतज्ञता वाटल्यावांचून राहात नाहीं. कांहीं वेळां तर तुम्ही व वर्तक मला neglect केल्यासारखें वाटूं नये अशी जाण बाळगूनच वागलेले आहांत. इतर वेळीं तुमचा जात्याच मोकळा व उल्हासपूर्ण प्रेमळ स्वभाव मला केवळ आपल्या स्वभावधर्मानेंच सहजासहजीं फार उपकारी झाला. त्याची तुम्हा कोणाला कदाचित् जाणीवहि असणार नाहीं ... सर्व मंडळीस श्री. वर्तक, केशवराव, फाणेकर, बापट[२] सर्वांस माझे प्रेमपूर्वक प्रणाम सांगावे. मधूनमधून भेटी व्हाव्यात. सवडीनुसार विचारविनिमय पत्रद्वारा अगर कसाही

१. श्री. केशवराव भोळे.

२. श्री. कृ. ल. बापट. बी. ए., एलूएल्. बी. – आतां चिपळूण म्युनिसिपॅलिटीचे सेक्रेटरी.











होत जावा असें फार वाटतें." (ता. २४।११।२७.)

अण्णांच्या निधनानंतर पुण्याच्या दैनिकांतून जो शोकसमाचार प्रकट झाला, त्यामध्यें श्री. केशवराव दाते यांच्या बरोबरीनें माझाहि त्यांचा शिष्य म्हणून उल्लेख करण्यांत आला आहे. माझी स्वत:ची त्यांच्याबद्दलची भावना त्या प्रकारची होती. पण ते मात्र मला आपला स्नेहीच समजत. माझ्या पत्रांत मी त्यांना गुरुवर्य किंवा तीर्थरूप असा मायना लिहीत असे. ते आवर्जून "प्रेमपूर्वक सा. न. वि. वि." असें लिहीत. याबद्दल मी एकदां तक्रार केली असतां ते लिहितात:—

"मायन्याबद्दल फारशी बाटाघाट न करतां मला आवडणारा मायना मी लिहीत आहें. 'सा. न.' मुळें आपणाला जसें कसेंसेंच वाटतें, त्याप्रमाणें आपलें बरें व्हावें अशी इच्छा असूनहि 'आशीर्वाद' हा मायना लिहितांना जरा दुरावल्यासारखें होतें. मुलांच्या बाबतींत तो मायना साहाजिक येतो, पण स्नेह्यांच्या बाबतींत मोठेपणा घेतल्यानें दुरावल्यासारखें वाटतें. हिंदुसंस्कृतीला आपण पारखे झालांत किंवा गुरुजनांविषयींचा आदर आपले मनांत नाहीं अशी शंकाहि माझे मनांत आली नाहीं. आपण कितीही स्वतंत्र वृत्तीचे व्हा, माझी खात्री आहे आपण हिंदु आहां आणि हिंदूच राहणार. पृथ्वीचें गुरुत्वाकर्षण तोडून माणसें विमानोड्डाण करतात, तितपत फार झालें तर आपण अनिर्बंध व्हाल. पण हिंदुसंस्कृति ही गुरुत्वाकर्षणासारखीच बलवत्तर व व्यापक आहे. असो, खरोखरच 'धडे' द्यायला लागलों तुम्हाला मी! वय विसरतां येत नाहीं का वयाला विसर पडतो— काय म्हणायचें? ...... रामाचा वनवासहेतु वेगळाच धरून एक कथानक रचण्याची आपणांस जी कल्पना सुचली आहे, त्याबद्दल समक्ष भेटीनंतर चर्चा करणेंच मला बरें वाटतें. कारण कांहीं गोष्टींचा खुलासा झाल्याशिवाय त्यावर चर्चा करतां येत नाहीं. मात्र आपल्या मनांत स्वतंत्र 'नाट्य' खेळूं लागलें (निदान असें खेळूं लागल्याचें प्रथमच मला समजलें) ही नुसती गोष्टच अभिनंदनीय आहे ..." — (१।१०।२७)

साहित्यसृष्टींत आम्ही त्या वेळीं नव्यानेंच पदार्पण करण्याच्या तयारींत होतों. त्याचप्रमाणें जीवनाच्या क्षेत्रांतहि होतों. जितक्या जिव्हाळ्यानें आणि निरलसपणें अण्णा आमच्या वाङ्मयकृतींचा परामर्श घेत, तितक्याच आपुलकीनें आणि सडेतोडपणें आमच्या सांसारिक कृतींचा आणि वृत्तींचाहि ते प्रपंच करीत. यामुळें एक वडीलधारे आप्त या नात्यानें आम्ही त्यांच्याकडे पाहात असूं. आमच्या पत्रव्यवहारांतला बराचसा भाग अर्थातच त्या प्रकारच्या मजकुरानें व्यापलेला असणें स्वाभाविक आहे. त्यांतील उतारे या लेखांत देण्याचा माझा मानस नाहीं; पण अण्णांच्या खाजगी समालोचनपद्धतीचे निदर्शक असे कांहीं उतारे येथें देणें अप्रस्तुत ठरणार नाहीं, असें वाटत असल्यामुळें ते मात्र उद्धृत करीत आहे: —

"आपला हस्तलिखित मजकूर प्रथमच मुद्रित होऊन आला म्हणजे त्यांतील काव्य कांहीं औरच असतें...काणेकरांच्या 'चांदराती'चा वेध लावणारा थोडासा प्रकाश रा. वर्तक यांनीं आपल्या 'तुतारीच्या पडसादां'त प्रकाशित केला असला तरी 'रत्नाकरां'त तो प्रथमच पूर्ण प्रकाशित झाला असल्यामुळें तो पहिल्या अनुभवाचा त्याचा आनंद आतांच प्रथम मिळत आहे. या आनंदांत मीहि सहभागीदार आहे असें रा. काणेकर यांस सांगावें. कविता याहून आधीं हातीं आली असती तर रा. अप्पासाहेबांना[३] तिला संपादकीय मानाचें स्थान (Place of editorial pride) देतां आलें असतें असें मला वाटतें.

३ श्री. अनंत सखाराम गोखले, संपादक, 'रत्नाकर'.










"'प्यूत्वा' ही गोष्ट मलाहि फार आवडली. मानवी मनाच्या जगांत 'कल्पना' ही देव, दानव, यक्ष, किन्नर, पिशाच्च निर्माण करून त्यांना नामरूप त्याप्रमाणें स्थान व कथा देऊन कशी चिरस्थायी करते हा चमत्कार अगदीं सहज संभवनीय अशा साध्या गोष्टींच्या रूपानें अनॅटोल फ्रान्सनें 'प्यूत्वा'मध्यें सुबोध रीतीनें उलगडून दाखविला आहे. भाषांतरहि तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें पुढें पुढें अगदीं सहज-मनोहर झालें आहे. मास्तरांच्या 'नाट्यस्वप्ना'वरील आपला अभिप्राय उद्यां ते आले म्हणजे त्यांस वाचून दाखवीन. मला वाटतें तो त्यांस पटल्यावांचून राहणार नाहीं. Galsworthy चें 'A Little Dream' हें नाट्यप्रकरण सहज हातीं आल्यास अवश्य वाचीन. मास्तरांच्या चांगल्या लिखाणाच्या तोडीला हें त्यांचें नाट्यस्वप्न येऊं शकत नाहीं असें मला वाटतें. मला फक्त त्यांतील सुरुवातीचा भागच (पहिला प्रवेश) आवडतो. तरीहि त्याला जोडले-ली लांबचक 'Stage Direction' अनावश्यक वाटते... " (ता. २१।१।२८).

"...रा. काणेकरांचें गाणें मला आवडलें. दोन तीन शब्द जरी कोळयाला न शोभणारे आहेत तरी कल्पना मात्र (चांगल्या अर्थी) स्वैरवृत्ति-अनि-रुद्ध अशा निसर्गाच्या सहवासांत वाढलेल्या तरुण कोळयाच्या अंत:करणांत सहज येणाऱ्या अशा आहेत. हें गाणें पालुपदाचें आहे. म्हणजे कल्पनांनीं हवें तितकें वाढवितां येण्यासारखें आहे. गोविंदा-ग्रजांनीं व बालकवींनीं तें वाढविलेंहि असतें. रा. काणेकर एखाद्या हृदयस्पर्शी भावनेच्या अवसाना-(touch) नें त्याला कोठेंतरी विराम देतील तर अधिक चटका लावणारें होईल, असें आपणांस वाटत नाहीं का? ...'टागोरांचा नाजुकपणा आपल्या मराठी वृत्तांत येतच नाहीं!' हें रा. काणेकरांचें म्हणणें कांहीं अंशीं खरें आहे. सामान्यत: कोणत्या-हि कवीच्या, विशेषत: भावगीतांतील नाजुकपणा संपन्न भाषेंत देखील तितक्याच नाजुक रीतीनें उतरेल कीं काय याची शंकाच वाटते. तथापि मी वर 'कांहीं अंशीं' म्हटलें आहे याचें कारण 'जगांत असंभाव्य असें कांहीं नाहीं.' एखादा तसाच कवि तेंहि करून दाखवील. माझा भाषांतराचा प्रयत्न[६] संस्कारासाठीं आहे हें मी आपणास आरंभींच कळ-विलेलें आपणाला स्मरत असेलच. माझ्या परवाच्या भाषांतरांत, 'जोडीसाठीं ओढतिं हृदयें—हाय! दूर भटकतीं' यांत 'हाय!' शब्दानें मुळांतील कवि-हृद्गताला मी जरा अधिक (Melodramatic) जोर दिला असें मला कळून आलें. हें कळून आलें हाच मी मजवर संस्कार झाला असें समजतों.···

"रा. वर्तक ईस्टरमध्यें आले होते. चार दिवस खरोखर मजेंत गेले...इब्सेन्बद्दलचे माझे अद्याप अपक्क असेच विचार त्यांचेजवळ थोडे बोलावयास मिळाले. ते त्यांना अगर कोणालाहि अद्याप मला पटवितां येतील असें मी म्हणूं शकत नाहीं. मानवी व्यवहारांची छाननी करून त्यांचीं नाट्यरूपानें कुशलतेनें चित्रें रेखाटणारा मोठा नाट्यकवि म्हणून एक पक्षीं माझे मनांत त्याचेबद्दल अत्यंत आदर व प्रेम उत्पन्न झालें आहे. तर दुसरे पक्षीं उपजत बुद्धीनें म्हणजे परमेश्वरी प्रेरणेच्या भावनेनें ही नाट्यसृष्टि झालेली नसून स्वतंत्र बुद्धीच्या चिकित्सक शक्तीनें सृष्टिकर्त्याची जागा घेऊन प्रतिसृष्टी-प्रमाणें निर्माण केलेली आहे. ती कुतूहल उत्पन्न करते, मनावर परिणामहि होतो, पण ही स्वतंत्र बुद्धी-

४ अनुवादक: श्री. अ. ज. करंदीकर.

५ शंकर काशीनाथ गर्गे मास्तर: नाट्यछटाकार 'दिवाकर.'

6 'Ah Poet! The evening draws near'... या रवींद्रनाथांच्या 'The Gardener' मधील गीताचा श्री. कारखानीसकृत "सर्वही मजकडे आशेनें पाहती"! हा अनुवाद.










ची मानवी कृति सर्वस्वीं खरीच असेल का असा संशय मनांत उत्पन्न झाल्यावांचून रहात नाहीं त्या कृतींत मानवी व्यवहाराचें बौद्धिक पृथक्करण कमालीचें झालेलें आहे. पण तें करतांना कदाचित् कांहीं सूक्ष्मतर तत्त्वें पृथक् झालीं नसतील, कांहीं कदाचित् पृथक् होऊन बाष्पीभवनानें निसटून गेलीं असतील, अशा अनेक शंका मनांत येतात. तात्पर्य, सध्यां तरी इब्सेनबद्दल माझी द्विधाबुद्धि आहे. पण इब्सेनविरुद्ध जो सामान्यत: जुना पक्ष आहे त्याच्याशीं मात्र मी समरस होऊं शकत नाहीं. माझा अभ्यास अद्याप अपुरा आहे. म्हणून हें माझें मत ठाम असें मी म्हणत नाहीं.... " –– ( ता. २३।४।२८ )

" ' सुशीलेचा देव ' या कांदबरीची सुरुवात आपणाला कशी काय वाटली ? एक प्रकारचा नवेपणा तर तिच्यांत आहेच. पण उषःकालीं उमलत असलेलें फूल दरवळावें असा कांहींसा भास मला झाला. एखाद्या सुप्रसिद्ध महाराष्ट्रीय टीकाकाराच्या दृष्टीला हें माझें लिहिणें पुस्तकी वाटल्यावांचून राहाणार नाहीं ! कारण मी कधींकाळीं उषःकालीं उठल्याबद्दलचा पुरावा कोठें आहे ? असल्या पुराव्याचे अभावीं गडकरी कधींहि अरुण पहावयाला उठले नव्हते असें निःसंशय सिद्ध झालें आहे... "
–– ( ता. २९।१।२९. )

' नवभारतां'तील माझ्या मागील लेखांत, व्यवसायांतून निवृत्त झाल्यावर अण्णांनीं केलेल्या अनेक विषयांच्या वाचनाचा व व्यासंगाचा मीं हवाला दिला आहे. त्या विधानाला उपोद्बलक होतील असे अनेक उल्लेख अण्णांच्या मला आलेल्या या पत्रांत आहेत :

" इकडे येतांना आगगाडींत या खेपेस वाचावयास 'Damaged Goods' होतें. म्हणून संकल्पाप्रमाणें 'Gardener' ला हलकें हलके मराठी माळी बनविण्याचा उपद्व्याप या खेपेस झाला नाहीं. ... आपण वाचून दाखविलेली 'Bird' वरील कविता मराठींत उतरविण्याचा प्रयत्न केला. रवींद्रनाथांच्या उच्चस्थानावरून तिला मराठींत खालीं उतरविण्याचाच हा प्रयत्न आहे, असें आपणांस वाटेल.

" कवि होण्याची पात्रता नसतांना व म्हणून इच्छाहि नसतांना हा उपद्व्यापच मी कां करतों ? प्रत्यक्ष कवि होण्याची पात्रता नसली तरी मनोरचना त्यापैकीं आहे. कवितेंत केव्हां केव्हां रमावेसें वाटतें. कडाक्याच्या वादविवादांचा ' शास्त्रविनोद ' जर सर्वांनीं केलेला चालतो तर ' काव्यविनोद ' तरी कां चालूं नये ? शिवाय मला कांहीं संस्कारांची जरूरी दिवसेंदिवस अधिक भासत आहे. "
— ( ता. २८।९।२७ )

" ... रा. केशवरावँ येथून गेल्यापासून मी इब्सेनवर तडाखा मारला आहे. प्रथम ' The Pretenders' हें नाटक वाचलें. गेल्या आठवड्यांत ' Peer Gynt ' हें काव्यात्मक नाटक वाचलें. व ' Brand ' चाहि कांहीं भाग वाचून झाला आहे. या उतावळ्या अधाशीपणाचा परिणाम मात्र थोडा प्रकृतीवर झाला. मानसिक व शारीरिक थकवा आला असून एकदोन दिवस झोपहि नाहींत. तीं पुस्तकें सामान्य नाहींत. मन उन्नत करणारे संस्कार तर त्यामुळें होतातच, पण आपल्या कल्पना व विचार यांना व्यापकपणा देऊन त्यांच्या व्यक्तीकरणाचे आडाखे व मांडणी यांची दृष्टीहि अधिक सूक्ष्म व व्यापक करतात. एकंदरीनें माझ्या अभ्यासाला दिशा फार चांगली लागली आहेसें वाटतें व त्यानें मनाला हुरूप फार येतो. मलाहि तुमच्याप्रमाणें ऑनर्स घेऊन परीक्षेला बसावयाचें आहे काय ? तूर्त थकव्यामुळें जास्त कांहीं लिहीत नाहीं. विश्रांति घेऊन हुषारी वाटतांच ' रत्नाकरा'करितां कबूल केलेली एक गोष्ट प्रथम पुरी करणार आहे. तिचें नांव ' राहिलेलें ऋण ' असें आहे. " Ah,

७ श्री. भोळे.






अनुक्रमणिका



Poet ! the evening draws near " ही रवींद्रनाथांची कविता पुरी केली आहे. ती एकदोन दिवसांत तिकडे पाठवीन... " – (ता. ९।२।२८).
" ... Prof. Moulton चें 'The study of the Modern Literature' हें एक पुस्तक वाचलें. आपण तें बहुधा वाचलें असेलच, नसल्यास जरूर वाचावें. World Literature चा उगम व विकास त्यांनीं फार सुंदर रीतीनें मांडला असून वाङ्मयाचे अभ्यासाची कल्पनाही या पुस्तकाचे वाचनानें चांगली येणारी आहे. त्यांचीं सर्वच पुस्तकें ही कल्पना विशेष विशद करण्यासाठीं लिहिलेलीं आहेत. त्याचें ' Shakespeare as a Dramatic Artist' हें पुस्तक मीं पूर्वी वाचलेंच होतें. आतां 'Shakespeare as a Thinker' हें वाचण्याची उत्कंठा उत्पन्न झाली आहे. तसेंच त्याचें ' The Modern Study of Bible' हेंहि वाचावेंसें फार वाटतें. पण येथें पुस्तकें मिळण्याची सोयच नाहीं... " -- (ता. १४।५।२९.)

"... Barrie वाचावयाला मिळाला आहे. मात्र तो इतर नाटककारांप्रमाणें सपासप वाचून होत नाहीं... " — ( ता. २६।७।३२. )

महाराष्ट्र-नाटक-मंडळीची मालकी श्री. केशवराव दाते व दत्तोपंत देशपांडे यांच्या हवालीं करून अण्णा व्यवसायनिवृत्त झाले. तरी महाराष्ट्र-नाटक-मंडळी व मराठी रंगभूमी यांबद्दलचा त्यांचा जिव्हाळा व तळमळ ही मुळींच कमी झालेली नव्हती व ते या संबंधांत उदासीनहि नव्हते.

" रा. आपटे[८] या बिनधंदेवाईक व सुशिक्षित नटाची माहिती आपण पत्रीं लिहिली आहे. पण ते कोणत्या भूमिकेला लायक आहेत - स्त्री कीं पुरुष – याचा खुलासा नाहीं. सध्यां महाराष्ट्र नाटकमंडळीला अगत्याची जरुरी स्त्री-पात्राची आहे. पुरुष-पात्रें नकोत असें नाहीं. इतकेंच नव्हे तर दोनतीन निराळया कामांचीं चांगलीं पुरुष-पात्रें हवींतच. पण प्रथम स्त्रीपात्रें–निदान एक तरी अवश्य नायिकेच्या कामाला मिळालेंच पाहिजे. आपलें लक्ष आतां तिकडें लागलें आहेच. व आपणांमध्यें कोणत्याहि कलेंतील चांगलीं माणसें हुडकून काढून आपलींशीं करण्याची हातोटीहि अजब आहे. तेव्हां महाराष्ट्र-नाटकमंडळीचे बरे दिवस पुन्हां पहावयास सांपडतील या आशेची निराशा होणार नाहीं असें वाटतें..."

"... आपणांस कळविण्यासारखी इकडील एक गोष्ट म्हणजे न्यू पूना कॉलेजनें गॅदरिंगच्या नाटकांतील नटांस बक्षिसें वाटण्याचा समारंभ गेल्या मंगळवारीं माझ्या हस्तें केला. महाराष्ट्र रंगभूमीला हा त्यांनीं मान दिला असें मी समजतों. महाराष्ट्र रंगभूमि मला आपला प्रतिनिधि मानो वा न मानो ! मी तरी आभार मानतांना रंगभूमीच्या तर्फें आभार मानले. या ऋणानुबंधाचें मजपाशीं स्मरण राहावें अशीही त्यांनीं आपली इच्छा प्रदर्शित करून मलाही प्रि. शहांचे हस्तें एक मोराचे आकाराची चांदीची गुलाबदाणी त्यांनीं दिली आहे. या प्रसंगीं मीं कांहीं बोलावें अशी त्यांची मनापासून इच्छा दिसल्यावरून माझी चांगलीशी तयारी नसतांहि भावार्थानें ' विश्वविद्यालयें व नाटयकला' या विषयावर सुमारें अर्धा तास बोललों. विश्वविद्यालयांत नाटयकलेची एक शाखा असणें जरूर आहे, हा माझ्या प्रतिपादनाचा मुद्दा होता. नट निर्माण करण्यासाठीं नव्हे - आणि या योगानें नट निर्माण होणारहि नाहींत–तर आमच्या शिक्षणांत निव्वळ शोषणक्रिया ( absorption ) होते व Self-expression ला– म्हणजे मनोगत प्रकट करण्याच्या क्रियेला–कोठें वावच नाहीं. त्यामुळें आमच्या विश्वविद्यालयांतून बाहेर पडलेल्या शेंकडा नव्याण्णव माणसांत बौद्धिक अग्निमांद्य दिसून येतें. यासाठीं Self-expression ची कला या दृष्टीनें नाटयकलेला विश्वविद्यालयांच्या अभ्यासक्रमांत स्थान अवश्य पाहिजे, असें त्यावेळीं तयारी नसल्या-

८ कै. शं. रा. ऊर्फ बापुराव आपटे सुप्रसिद्ध नट व मूक चित्रपट दिग्दर्शक.










अनुक्रमणिका

कारणानें जरा वेड्यावांकड्या रीतीनेंच प्रतिपादन केलें. माझा मुद्दा विचार करण्यासारखा आहे, असें मात्र कांहीं प्रोफेसरांना त्या वेळीं वाटलें असावेंसें दिसलें. या विषयावरील पुरावा गोळा करून मला पुढें लेख लिहावयाचे आहेत. आपणास-व आपल्या दरबारास हा मुद्दा कसा काय वाटतो तें जरूर कळवावें ... '' — (ता. २१।१।२८.)

श्रीछत्रपति शिवाजीमहाराज यांच्या जीवन-कार्यावर एक नाटक लिहिण्याचा विचार अण्णांच्या मनांत अनेक वर्षें घोळत होता. त्या संबंधांत ते एके ठिकाणीं लिहितात: —

" ... माझ्या नाटकाबद्दल तुम्ही व वर्तक यांनीं आपल्या या अल्प परिचयाचे काळांत किती-तरी वेळां अगत्यानें प्रोत्साहनपर बोलून धीर दिला आहे. जगाच्या कठोर उदासीनतेनें गारठलेल्या कोणाच्याहि स्फूर्तीला अशा प्रोत्साहनानें उबारा आल्यावांचून रहात नाहीं. आणि स्फूर्ति जर करपून गेली असेल तर कोंकणच्या भाजावण झालेल्या जमिनीला ज्या प्रमाणें मृगाचा पाऊस, त्याप्रमाणेंच असलें प्रोत्साहन उपकारी होत असतें. माझें अंगचें सामर्थ्य किंवा स्फूर्ति कांहीं असो वा नसो, पण तुमचें उभयतांचें हें प्रोत्साहन वांया जाऊं नये अशा-साठीं तरी मी धडपड करीन. महाराष्ट्राच्या इति-हासांतील शिवाजी नुसता रेखाटण्याची माझी इच्छा नसून, दृष्टीप्रमाणेंच सर्व ज्ञानेंद्रियांना ग्रहण करतां येईल व अर्वाचीन संस्कारयुक्त मनाला पटेल असा, रंगभूमीवरील दीपरेषेनें भारलेल्या मर्यादित क्षेत्रां-तील कां होईना, पण चालताबोलता शिवाजी निर्माण करण्याची माझी इच्छा– नव्हे महत्त्वाकांक्षा आहे. बटुवामनाची ही महत्त्वाकांक्षा आहे. पण बटु असो वा कसाहि असो जन्माला आल्यासारखी जगांत धडपड करायची ती क्षुद्र तरी कां करावी ? सिद्धीचें श्रेय नाहीं मिळालें तरी अशा धडपडीसाठीं स्वतःचें मन उन्नत व व्यापक केल्याचें समाधान तरी मिळेल. तुम्ही सुचविलेलें 'Abraham Lincoln' व वर्तक यांनीं सुचविलेलें शॉचें ' सीझर ' हीं ताबडतोब वाचलीं व त्यांपैकीं ' सीझर ' हें पुनः-पुन्हां वाचण्याजोगें आहे असें वाटल्यावरून येथें येतांच तें विकत घेऊन त्याचेंही मनन करीत आहे. तुम्ही उभयतांनीं प्रोत्साहन दिल्याचा दृश्य परिणाम तूर्त हा इतका झालेला तुम्हांस कळविला आहे. ''

— ( १९।१२।२७ ).

" ... मी आपल्याकडून सारखा धडपड करीत आहे, पण नाटक अद्याप मार्गाला लागत नाहीं. मात्र मी आपण होऊन कधींच नाउमेद होत नाहीं. शिवाजीच्या वेषांतरानें मला फार अडविलें आहे. तुमच्या सूचनेचा मी विचार करीत आहे. शिवाजी-चा प्रथम प्रवेशहि ( first entry ) मना-सारखा झाला पाहिजे. त्यासाठीं एक नवाच प्रवेश लिहिला आहे व तो बरा झाला आहे असें वाटतें. पण त्या योगानें नाटक मार्गाला लागलें तरच त्याची किंमत... '' — ( १४।५।२९ ).

अण्णा जितके तत्त्वचिंतनशील होते तितकेच ते कुटुंबवत्सलहि होते. याचीं अनेक उदाहरणें त्यांच्या पत्रांतून ठिकठिकाणीं आहेत. पण अशा प्रकारच्या खाजगी उल्लेखांचा या लेखांत अंतर्भाव करणें कदा-चित् उचित ठरणार नाहीं. म्हणून त्यांचा निर्देश करण्याचा मोह न बाळगतां त्यांच्या स्थितप्रज्ञवत् वृत्तीचा द्योतक असा एकच उतारा उद्धृत करून ही श्रद्धांजलि पुरी करतों:—

" माझे कुटुंबावर दैवाचा कोप होऊन आमचे शांतारामाचा त्यानें त्याचे ऐन आयुष्याचे सुरवाती-सच बळी घेतला. त्याबद्दलची सर्व हकीकत चि. बंडू आज तिकडे टर्मसाठीं येत आहे त्याजकडून समजेल. औषधांची, शुश्रूषेची धावाधांव त्यानें पराकाष्ठेची केली. कोणाच्या कसल्याहि प्रयत्नाला यश आलें नाहीं. दुखण्याचें वास्तविक स्वरूप प्रथम यावें तसें लक्षांत आलें नाहीं. आमचा भित्रेपणा व अडाणीपणाहि नडला. जन्माची चुटपुट लागण्यासारखें झालें आहे. ' All loss, all pain is parti-cular; the universe remains to the heart unhurt' हें इमर्सनचें वचन अगदीं खरें आहे. पण आमचें हृदय हें विश्वहृदय होईल तेव्हांच तें शाबूद राहील.... '' — ( २।९।२८ )

— के. नारायण काळे











# अण्णांच्या कांहीं आठवणी

अण्णांची आणि माझी अगदीं पहिली भेट १९३० च्या मे महिन्यांत झाली. त्यांच्या समोर मी अगदीं पहिल्यांदा उभी राहिलें ती 'रत्नाकर'मधील एक नवोदित लघुकथालेखिका म्हणून. आणि वर्ष-दोन वर्षं त्यांनीं माझ्या लघुकथांकडेच लक्ष पुरवलं. अत्र्यांचं 'घराबाहेर' नाटक पाहून आल्यावर मला काय वाटलं कोण जाणें पण मी त्या नाटकाचं परीक्षण करण्याचा बेत केला! मी तें परीक्षण लिहीत असल्याचं अण्णांना सांगितलं, आणि त्यानंतर त्यांनीं त्या परीक्षणाचा झक्कूच माझ्यामागें लावला! "परीक्षण संपलं कां? दाखवा बरं वाचून!" आणि घाबरत घाबरत मी तें त्यांना वाचूनहि दाखवलं. आणि त्यानंतर पुष्कळ दिवस त्यांनीं मला नाटक व इतर वाङ्मयप्रकार यावर कितीतरी माहिती ऐकवली.

त्यानंतर बरेच दिवस गेले. मी लिहावं तितकं लिहीत नाहीं अशी अण्णा तक्रार करीत; "वेळ होत नाहीं म्हणजे काय? केला पाहिजे" अशी धमकी देत आणि कुठून मला एकें दिवशीं दुर्बुद्धि झाली कोण जाणें, एक नाटक लिहिण्याचा संकल्प मी अण्णांच्याजवळ जाहीर केला! त्या दिवसापासून अण्णांच्या दृष्टीस पडायची सोय उरली नाहीं! केव्हांहि आणि कोठेंहि भेटोत, तर पहिला प्रश्न "नाटक कुठवर आलं?"! एकदां फूटपाथवर लांब त्यांना पाहिल्यावर चपळाईनें रस्त्यावर उतरून गर्दींत सामील झाल्याचंहि मला आठवतं आहे!

– पण अखेर मी नाटक लिहिलं. अण्णा म्हणत "पुरतं झाल्यावर वाचूं; उगीच १ । २ अंक नकोत." शेवटीं नाटक वाचायचं ठरलं. अण्णा 'इंटरनॅशनल-'मध्यें रोज येत. तेव्हां एका संध्याकाळीं, मागच्या बागेंत, धडधडत्या अंतःकरणानें मी 'जुगार' वाचायला सुरुवात केली. दोन–तीन पानेंच वाचून झालीं आणि वरच्या सायलीच्या मांडवावरून एक पालच माझ्या अंगावर पडली! मी घाबरलें ती खरी पालीला, पण अण्णांना भीति वाटली कीं कांहीं शुभाशुभ तर माझ्या मनांत उभें रहाणार नाहीं? पण हें स्पष्ट न विचारतां त्यांनीं होऊनच माहिती द्यायला सुरुवात केली: "ह्या पाली पडण्याला कांहीं अर्थ नसतो बरं का? मी घरीं बसतों ना, त्या माडींत खूपच पाली आहेत– पटापट माझ्या अंगावर पडतात–. पुढें सुरूं करा तुम्हीं वाचन." आणि ती वाचनाची गाडी पुन्हां रुळावर येईपर्यंत अण्णा अस्वस्थ होते–. दोन दिवस मी वाचलें. ऐकतांना ते क्वचितच प्रश्न विचारीत आणि पुन्हां म्हणत– "पण नको आतां! बोलण्यांत अर्थ नाहीं. कदाचित् पुढल्याच अंकांत ह्याचें उत्तर असेल." मला अण्णांच्या प्रश्नापेक्षां एकाग्रचित्तानें ऐकण्याचाच धोका जास्त वाटे!

चौथा अंक संपला. उषेचं वाक्य आलं: "दुसऱ्याच्या दुःखांतून स्वतःची सुखनिर्मिति होऊंच शकत नाहीं." अण्णा एकदम आवेशानें उद्गारले: "हें हें या नाटकाचं सूत्रवाक्य आहे." आणि मग त्यांच्या चर्चेला जी सुरवात झाली ती पहिल्या प्रयोगापर्यंत!

'जुगारा'च्या तालमींच्या वेळीं खूपच गमती होत आणि गंभीरप्रकृति अण्णा कधीं विनोदहि करीत. एकदां अण्णा आणि केशवराव दाते येऊन बराच वेळ झाला तरी सगळा नटवर्ग आला नव्हता. खुर्चीवरून उठून व्हरांड्यांतून बाहेर नजर टाकून, कोणी नाहींसें पहातांच दाते हंसून म्हणतात: "अण्णा, मला वाटतं ह्या नाटकांत काम करण्याकरतां तुम्हांला आणि मला रंगावं लागणार." अण्णा त्यांच्याहिपेक्षां मोठ्यानं हंसून म्हणाले: "पण दीक्षितांना म्हणावं आम्हां दोघांना निदान स्त्रियांचे पार्ट देऊं नका."

त्याच सुमाराची गोष्ट. पहिल्या लिखाणांत दुसऱ्या अंकांत उषा वसंताकडे लग्नाचा निश्चय करून जाते आणि दुसऱ्याशीं लग्न करून सुखी होण्याचा त्याचा उपदेश ऐकून संतापून म्हणते: "वसंत, तूं मला हें सांगतोस? मला कुठें स्थळ मिळत नाहीं म्हणून का












मी तुझ्याकडे आलें ?'' कै. वि. द. साठे आणि मी यांच्यांत भांडण उभें राहिलें ! साठे म्हणत '' हें वाक्य कठोर आहे, झोंबणारं आहे. कुठलीहि प्रेयसी प्रियकराला हें वाक्य बोलणार नाहीं.'' मी म्हणे : '' जरूर बोलेल ! '' अखेर एका चचत तो वाद अण्णांच्या न्यायालयांत गेला, आम्हीं दोघांनीं आपापली बाजू मांडली. अण्णांची त्या वेळची तीक्ष्ण नजर मला अजून दिसते आहे. ते एकदम आवेशानें म्हणाले : '' कां नाहीं म्हणणार ? याहून कठोर बोलेल. साठे, तो प्रसंग लक्षांत आणा '' आणि मग त्या संतप्त desperate प्रेयसीचं इतकं नाट्यपूर्ण वर्णन अण्णांनीं केलं कीं खिलाडू साठे आपला दावाहि विसरले ! अण्णांच्या मठींतून त्या दिवशीं आम्हीं बाहेर पडलों ते अण्णांच्या आवेशपूर्ण वक्तृत्वानें भारून !

गेल्या डिसेंबरच्या सुरुवातीची गोष्ट. मी मुंबईस होतें. दाते यांजबरोबर माझ्या नवीन 'अंधारांतून' नाटकाची नाट्यचर्चा करीत होतें– तोंच दात्यांना एकदम पुण्यास काम निघालं. अर्थात् मीहि त्यांच्याबरोबरच पुण्यास आलें. आलों तोच बातमी कळली कीं अण्णा facial paralysis च्या झटक्यानें आजारी आहेत आणि पाटीवर सारखं दात्यांचं नांव लिहून दाखवताहेत ! आम्हीं बरोबरच त्यांच्या घरीं गेलों. अण्णांची वाणी खुंटली होती. त्यांना हातानीं लिहायला कष्ट होत होते पण डोळे बोलकेच होते ! दाते अण्णांच्या पलंगावर बसले. मी समोर. उसनं अवसान आणून दात्यांनीं '' औषध कुणाचं ? बरं वाटेल तुम्हांला अण्णा '' असं कांहींतरीं म्हटलं. त्यांची धाकटी मुलगी कमल हंसूनच म्हणाली ''त्यांनीं तुमचा ध्यास घेतला आहे. तुम्हीं आलांत आतां बरं वाटेल त्यांना. '' त्या दुखण्याचं पर्यवसान मनोमनीं कळत असतांना आम्हीं सगळेच उत्साहानें हंसून बोलत होतों. अण्णा मध्येंच उठून बसले आणि जवळ बसलेल्या दात्यांच्या अक्षरशः गळयांत त्यांनीं हात टाकले. अर्थपूर्ण, करुण दृष्टीनें त्यांच्याकडे पाहिलं. एकदम वातावरण गंभीर झालं ! अण्णांच्या डोळ्यांत पाणी, दाते गोरामोरा चेहरा करून अश्रु लपविण्याचा प्रयत्न करताहेत ! त्यांचा आवाज घोगरा झाला. गळयांतून शब्द फुटेना. ज्या अशुभ घटनेला शब्दरूप द्यायचं प्रत्येकजण टाळीत होता ती घटना जणूं काय अवचित् येऊन प्रत्यक्ष समोर उभी ठाकली ! क्षणमात्र सर्वच गोंधळले ! मला मात्र तो एक ऐतिहासिक महत्त्वाचा क्षण वाटला ! प्रेमळ पण कर्तव्यनिष्ठुर गुरु आणि गुरूबद्दल नितांत आदर बाळगणारा निष्ठावान्, विनयसंपन्न शिष्य ! अण्णांच्या डोळ्यांत कितीतरी भाव एकवटले ! दात्यांच्याबद्दल वाटणारी कृतार्थता, प्रेम, अभिमान, रंगभूमीच्या सेवेचं कार्य पुढें चालविण्याची विनंति, आणि शेवटीं '' आम्ही जातों आमुच्या गांवा, आमुचा रामराम घ्यावा ''–अशी शेवटच्या निरोपाची भावना ! त्या ' मूड 'मधून बाहेर पडायला सर्वांनाच कष्ट पडले.

गेल्या एप्रिलमधली गोष्ट. श्री. के. नारायण काळे यांनीं अण्णांच्या ' स्वैरिणी'चें सुंदर रेडिओरूपांतर केलं. ५ । १० मंडळींना तें वाचून दाखवून रेडिओकडे पाठविलें. एके दिवशीं मी उत्साहानें अण्णांच्याकडे जाऊन म्हणाले : '' अण्णा, तुमचं ' स्वैरिणी' प्रत्यक्ष रंगभूमीवर आतांपर्यंत येऊं शकलं नाहीं; पण आतां तें आकाशवाणीवरून खास ऐकायला मिळणार. '' – पण तें झालं नाहीं. – लिखाण परतहि आलं नाहीं. आणि तें ध्वनिक्षेपित न होण्याची कांहीं विनोदी कारणपरंपरा माझ्या कानावर आली ! मूळ नाटककार अगर रेडिओप्रतरकार ( अथवा दोघेहि ! ) कम्युनिस्ट होते म्हणे ! मला सर्वच विनोद वाटला, कारण त्याचवेळीं मुंबई सरकारच्या शिक्षणखात्यातर्फे प्रायमरी टीचर्सच्या नाट्यशिक्षणाचा नवीन कोर्स आंखण्यापासून, तो कोर्स पार पाडण्याचें कार्य मुंबईसरकारनें रेडिओप्रतरकाराकडे सोंपविलें होतें. भारतसरकारचे अधिकारी बुल्गानिन व क्रुश्चेव्ह यांच्या अपूर्व स्वागतांत मग्न होते ! ८० वर्षांचे नाट्यतपस्वी अण्णा तर आपल्या मठींत बसून फक्त लेखनवाचन व नाट्यविषयांतील ' जिज्ञासूंचें समाधान ' करीत होते. अर्थात् मला त्या सर्वच गप्पा वाऱ्यावरच्या वाटल्या. पण ' स्वैरिणी ' आकाशवाणीवर, अजूनपर्यंत झालें नाहीं हें सत्य होतें–एक गूढ होतें ( आणि अजूनहि आहे ! )

अखेर एक दिवस मला अगदीं न राहवून मीं पुन्हा अण्णांच्याकडे गेलें. मला वाटलें अण्णा कांहीं तरी विचारतील. पण ते माझ्याच नाट्यलेखनावर बोलूं लागले ! अखेर गमतीनें मींच म्हणालें '' अण्णा,

तुमच्या 'स्वैरिणी'मुळें स्वराज्यांतल्या व्यवस्थेला धोका पोंचण्याचा संभव दिसतो ! परकी, संशयग्रस्त, ब्रिटिश नोकरशाहीला धडकी भरली ती 'कीचकवधा'-सारखं तुम्हीं रंगभूमीवर आणलेलं कर्झनशाहीवरचं ज्वलंत रूपक पाहून ! सत्तांध, मदोन्मत्त कीचकाचा अवतार, आणि शेवटच्या अंकांत त्याच्या छातीवर बसलेला भीम हीं दृश्यें प्रत्यक्ष पाहिल्यानंतर ब्रिटिश नोकरशाहीला धडकी भरली ! पण आमच्या शूर हिंदी नोकरशाहीला, तुमच्या 'स्वैरिणीं'तील बालिका 'अंबे'चा कोमल आवाज लांबून ऐकूं येणार या नुसत्या कल्पनेनेंहि थरकांप झाला असावा ! आतां बायका अबला खास राहिल्या नाहींत ! उलट, त्यांच्याच जादा गौरवाचे दिवस आले आहेत. तसं नसतं तर पुण्याचें रेडिओ-केंद्र होऊन तीन वर्षे होऊन गेलीं, ऑल इंडिया-रेडिओ-खात्यांत उच्चाधिकारावर असलेली मंडळी मराठी वाङ्मयाचे अभ्यासी आहेत. रेडिओच एकंदर शुद्धीकरणाचं कार्य पहातां, रंगभूमीचं शुद्धीकरण करणाऱ्या तुमचा त्यांना विसर पडणं शक्यच नाहीं, पण ज्या अर्थी आतांपर्यंत रंगभूमिविषयक एक साधं भाषण सुद्धां आकाशवाणीनं तुम्हांला दिलं नाहीं त्या अर्थी हा काळ पुरुषांच्या कर्तृत्वाचा नाहींच !". या माझ्या बोलण्यावर अण्णाहि मनापासून खूप हंसले !

— पण त्या विनोदी गप्पांचं खिन्नतेंत रूपांतर व्हायचं होतं. शेवटच्या दुखण्यानं अण्णा आजारी पडल्याबरोबर त्यांच्या मित्रमंडळींनीं धांवाधांव करून आकाशवाणीला विनंति केली : "अजून तरी 'स्वैरिणी' करा." मीहि पुण्याच्या अधिकाऱ्यांना पत्र पाठवून, अण्णांचं वय, दुखणं, त्यांनीं नाट्यक्षेत्रांत केलेली कामगिरी या सर्वांचा पाढा वाचला, पुन्हा विनंति केली : "अजून तरी 'स्वैरिणी' करा". मला उत्तर आलं : "दिल्लीसरकार या गोष्टीचा विचार करीत आहे !"

— शेवटच्या दिवशीं अण्णांची ती शांत चिर-निद्रा पाहतांना माहितगार मंडळींच्या मनांत आकाश-वाणीच्या कर्तृत्वाबद्दल घृणाच निर्माण झाली ! आपल्या ऐन उमेदीच्या काळांत "खाडिलकरांचीं नाटकें बंद करा, नाहीं तर कंपनी बंद करूं" या मे. डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटच्या हुकुमाला धाब्यावर बसवून कंपनी चालूं ठेवणाऱ्या, रंगभूमीला विशुद्ध, तेजस्वी आणि निर्भय बळण लावणाऱ्या अण्णांचें एक पौराणिक नाटुकलें स्वराज्यांत, आकाशवाणीचा अधिकारी वर्ग मराठी—भाषिक असल्यामुळें अण्णांची कर्तबगारी जाणणारा असतांना सुद्धां रंगभूमीवर नव्हे पण 'वाऱ्यावर' (Air वर) सुद्धां त्यांच्या जिवंतपणीं येऊं शकलें नाहीं यापरता दैवदुर्विलास तो काय ?

— सौ. मुक्ताबाई दीक्षित

## 'एक नाट्यकलापीठच !'

१९०४-५ च्या सुमारास महाडास नाटकाची आवड असणारे जे ध्येयवादी तरुण होते त्यांत टिपणीसबंधु होते, तसेच अण्णाहि होते. या तरुणांनींच 'महाराष्ट्र नाटकमंडळी' ही गद्य नाट्यसंस्था १९०५ सालीं स्थापन केली. त्यांना वऱ्हाडांतून कै. गणपतराव भागवत येऊन मिळाले. महाराष्ट्र नाटक-मंडळीचे (टिपणीस-भागवतांप्रमाणें) अण्णा फार मोठा आधार होते. आपल्या विषयाचा सांगोपांग अभ्यास करणें, त्यावर चिंतन करणें, प्रो. भानु, पानशे, कै. खाडिलकरांसारख्या विद्वान् मंडळींशीं नाट्यविषयावर चर्चा करून, त्यांचे आपल्याला पटलेले विचार ग्रहण करून ते अमलांत आणण्याचें फार मोठें कार्य त्या काळीं या तरुणांनीं केलें. या तरुणांच्या पूर्वी अशाच प्रकारचें कार्य कै. बळवंतराव जोग या कै. गणपतराव जोशांबरोबरीच्या नटानें केलें होतें. शाहूनगरवासी मंडळीच्या बैठकीं-मध्यें नाट्याची चिकित्सा कै. प्रो. वासुदेवराव केळकर, कै. दादासाहेब खापर्डे करीत, त्यांत कै. गणपतरावांपेक्षां बाळाभाऊ जोग जास्त भाग घेत. महाराष्ट्र मंडळीच्या बैठकींत प्रो. भानु-पानशांशीं नटवर्य भागवत-टिपणीसां-बरोबर अण्णाहि चर्चेत भाग घेत. नाट्यलेखनापासून तों नाटक बसविण्यापर्यंतच्या सर्व तपशीलांचा खल या बैठकींत होई, तसेच प्रेक्षकांच्या प्रतिक्रिया कशा होतात, कां होतात, याचीहि चर्चा होई. अण्णा म्हणत, "या बैठकी म्हणजे एखाद्या विद्यालयांतले वर्गच म्हणायला हरकत नाहीं. नवेनवे प्रयोग करावे, त्याचे प्रेक्षकांवर होणारे परिणाम तपासावे, त्यांत सुधा-रणा कराव्या, नव्या होतकरू नटांना तालमी देऊन तयार करावें, असें आमचें हें नाट्य-कलापीठच होतें."

— श्री. केशवराव भोळे

['मौज' (१५।१।५६) मधील लेखांतून]







# ‘तुम्ही युवराज आहांत हें विसरूं नका!’

मला वाटतं, तें १९३७ साल असावं. मुंबइच्या ग्रँन्ट मेडिकल कॉलेजच्या वाङ्मयमंडळाचं स्नेहसम्मेलन. ‘पुण्यप्रभाव’ नाटकाचा प्रयोग. वैद्यकीय अभ्यासक्रमाच्या अवघडपणामुळें, आणि किती वेळां परीक्षा द्यावी याला त्या वेळीं नियम नसल्यानं, कॉलेज-विद्यार्थी ‘बाप्ये’च असायचे! ‘पुण्यप्रभावां’त राजपुत्राचं काम करण्याजोगा विद्यार्थी आणायचा कुठून?

दिग्दर्शक होते कै. ती. **अण्णासाहेब कारखानीस.** आमच्या भावे हायस्कूलमधील गुरुजी श्री. त्र्यं. ग. बापट ती. अण्णासाहेबांच्या चांगल्या स्नेहांतले. त्यांनीं माझी शिफारस केली होती. मी तें राजपुत्राचं काम बापटगुरुजींच्या दिग्दर्शनाखालीं इथं शाळेंत केलेलं होतं —

तर अशी मी मुंबईला पोहोचलें. तालमी सुरूं झाल्या —

तिसऱ्या अंकांतच मला जरा ‘काम’ म्हणण्याजोगं काम! – “नुसत्या निकट सहवासानें ... महाराज विचार करा; माझी खात्री आहे कीं, हें सारं कारस्थान या वृंदावनाचेंच आहे-याच्या बोलण्यावर विश्वास ठेवूं नका!” ... नि मग लगेच,

‘भुलुनिया खलजनालापा ... ...’ हें गाणं.

ती. अण्णासाहेब म्हणत, “युवराज, तुम्ही युवराज आहांत, हें विसरूं नका. मंडलेश्वर भूपालावर तुमचा विश्वास आहे, प्रेम आहे, वृंदावनाबद्दल तुम्हांला अनादर आहे ...”

“ – थांबा; पुनः म्हणा. गाणं नाहीं नुसतं. त्या आधींचं भाषण. भाषण संपतां संपतां वृंदावनाबद्दलचा त्वेष दिसूं द्या चेहऱ्यावर – उतरूं द्या शब्दांत – ...”

... “आणि ‘खलजनालापा’ ... या ‘खल’ शब्दावर उजव्या हातानं वृंदावनाकडे निर्देश करा – खलजनालापा – पुरं म्हणा ‘– लापा’ – एवढाच शब्द श्वास तोडून म्हणूं नका ... ...”

कीं मग पुनः सुरूं. शब्दांत त्वेष उमटला, तर खरा जोष तिथंच संपे! स्वरांत उमटला, तर त्या हस्तक्षेपाचा निर्देश हटकून ‘लापा’ वर ... !

पण ती. अण्णासाहेबांना धीर होता – सहानुभूति होती. पुढं सारं कांहीं जमूं लागलं.

कै. ती. अण्णासाहेबांची माझी ही एवढीच आठवण, हा एवढाच परिचय. माझ्या लहान वयांत झालेला हा परिचय, श्री. विठ्ठलराव दीक्षितांच्या इंटरनॅशनल बुकडेपोच्या परिसरांत पुनः एकदां नव्यानें उजळला गेला होता. तरी त्याहिपुढें तो अधिकाधिक वृद्धिंगत होण्याला नन्तर संधि मिळाली नाहीं.

एक काळ होता ३०।३५ वर्षांपूर्वींचा महाराष्ट्राच्या सर्वाङ्गीण उत्कर्षाचा. – त्या काळांतलं साहित्य नि संगीत प्रत्यक्ष नव्हे, तरी ग्रंथरूपानं आणि ध्वनि-मुद्रिकांच्या रूपानं आमच्यापर्यन्त आलं. पण नाट्य? तें कांहीं ‘यां डोळां’ पाहिलेलं नाहीं.

– पण तरीहि कुठल्या तरी अकल्पित योगानें त्या सोन्याच्या कालावधींतले ती. अण्णासाहेबांसारखे नाट्य-महर्षि आपण जवळून पाहिले, आठवण राहण्याइतपत वयाची असतांना, त्यांच्या दिग्दर्शनाचाहि अनुभव ( – फार मोठा शब्द वाटतो इथं! – ) मिळाला, हेंहि समाधान थोडं नाहीं वाटत! कांहीं दिवसांच्याच या अल्पपरिचयानंहि त्यांच्या तपस्येचे कांहीं संस्कार माझ्या मनावर, न जाणों, अप्रत्यक्षपणें झाले असतील; आणि त्यामुळें जागी राहणारी स्फूर्ति माझ्या नृत्य-साधनेंत मला चेतना देत असेल!

ह्या चेतनेनं, ह्या स्फूर्तीनं आमच्या पिढीच्या हातूनहि कलाप्रान्तांत कांहीं कार्य घडो, आणि कै. ती. अण्णासाहेबांच्या आत्म्याला अविरत शान्ति लाभो. एवढीच ईशचरणीं प्रार्थना. ––

— रोहिणी भाटे



अनुक्रमणिका

# महाराष्ट्र-नाटकमंडळींतील सोज्वळ वातावरण

माझे आजोबा कै. दाजी भावे यांची कै. अण्णांशीं सुमारें २५ वर्षें निकट मैत्री होती. दाजी अण्णांहून वास्तविक १५–२० वर्षांनीं मोठे. परंतु मैत्रीचा पाया समान वयापेक्षां समान अशा नाट्य-व्यसनावरच आधारलेला होता. दाजी भावे रेल्वेंत नोकरी करून पोटाला मिळवीत असले, तरी खरें लक्ष नाट्यव्यवसायांतच. ऐन तरुणपणांत त्यांनीं स्वतः कांहीं पहिल्या प्रतीच्या भूमिकाहि केल्या होत्या. रंगभूमि सोडली तरी नाट्याबद्दलचें प्रेम तसं ताजेंच राहिलेलें. ही मनींची हौस ते इतरांना नाट्यप्रयोग बसविण्यास मदत करून पुरवीत. कांहीं कॉलेज-विद्यार्थ्यांकडून त्यांनीं 'वेणीसंहार' हें संस्कृत नाटक बसविलें होतें. नाट्याबद्दलचा अभ्यास व विशेषतः अभिनयांतील खांचाखोंचांचें सूक्ष्म निरीक्षण–यांमुळें ते अभिनयाचे जाणते टीकाकार होते. जुन्या अभिनयाच्या धाटणीपलीकडील अधिक वास्तववादी अभिनय ते सुचवीत. त्यामुळें ध्येयवादी अण्णा अनेक वेळीं त्यांच्या सूचना अगत्यपूर्वक अंमलांत आणीत.

एकदां एका नाटकांत नेहमींच्या वहिवाटीनुरूप स्त्रीपात्रांना घालावयास गजरे आणले होते. नाटक सुरूं झालें. नायिका व तिची दासी यांच्या प्रवेशांत दासीहि राणीबरोबर झुपकेबाज गजरा घातलेली. दाजींना हें पाहवलें नाहीं ! प्रवेश संपतांच दाजींनीं नेपथ्यगृहांत जाऊन ही चूक दाखवून दिली व दासी-पात्रास गजरा काढावयास लाविला. दाजींच्या अशा निरीक्षणाचा वेळोवेळीं प्रत्यय आल्यामुळें अण्णा दाजींना शेवटपर्यंत गुरुस्थानीं मानीत. मंडळीच्या प्रत्येक प्रयोगाच्या मुहूर्ताला दाजींना आमंत्रण असे. ज्या आदरानें प्रथमपासून अण्णा त्यांच्याशीं वागत तो आदर पुढें आलेले नवे नट – औंधकर, वैशंपायन वगैरेहि पाळीत. मंडळीच्या प्रत्येक प्रयोगाचे वेळीं किर्लोस्कर-रंगभूमीच्या डाव्या हाताकडील पहिल्या मजल्यावरील चष्मा–दाजी व त्यांच्या पाहुण्यांकरितां राखलेला असे.

जुन्या किर्लोस्कर रंगभूमीच्या पहिल्या पडद्याच्याहि पुढें 'मालविकाग्निमित्रां'तील नाट्य या विषयासंबंधीं दोन श्लोक दोन बाजूला टांगलेले असत. या संबंधींची चर्चा मुजुमदार, प्रा. भानू, दाजी वगैरे करीत असलेले आम्हांला आठवतें.

दाजींकडे कंपनींतील कांहीं नटांचें नेहमीं जाणेंयेणें असे. दाजींचें घरचें वळण त्या कालाप्रमाणें अंमळ सोवळेंच होतें. आमची थोरली आई (दाजींची पत्नी) फार कर्मनिष्ठ, पण तीहि या मंडळींचें आदरातिथ्य प्रेमानें करी. आमच्या अगदीं लहानपणीं मला आठवतें कीं अण्णा व दत्तोबा हे आमच्याकडे जेवावयास आले म्हणजे ते 'परभू' म्हणून त्यांना आपापलीं उष्टीं काढावीं लागत. पण तरीहि त्यांचे दाजींशीं असलेले मैत्रीचे संबंध दुरावले नाहींत. पूर्वी एकदां मंडळीचें बिऱ्हाड फुटक्या बुरजाजवळ कसब्यांत मुजुमदारांच्या वोळाच्या तोंडाशीं कोपऱ्यावर होतें. तेथें मंडळींतील नट सहकुटुंब सहपरिवार राहात. मला वाटतं चि. बंडू (भाई) त्या वेळीं तेथें फार लहान असा होता. गौरीच्या व संक्रांतीच्या हळदीकुंकवाचे समारंभहि करीत. त्या वेळीं आम्ही आजी–आईबरोबर नेहमीं जायचे. मंडळींच्या बिऱ्हाडांतील वातावरण अत्यंत घरगुती व सोज्वळ असे. गौरीच्या सजावटीच्या कामींच काय नाटकीपणा दिसेल तेवढाच. बाकी तेथें आम्हांला छाकटेपणें पुरुषांनीं ये–जा केल्याचें कधीं आठवत नाहीं.

त्या काळांत नट हा कितीहि हुषार व लोकप्रिय असला तरी वरच्या पांढरपेशी समाजांत तो हलकाच मानला जाई. पण त्याच काळांत महाराष्ट्र-नाटक-मंडळींतील नटांना मात्र घरगुती, सोज्वळ कुटुंबांत मिसळायला मिळे. महाराष्ट्र-नाटक-मंडळीच्या यशांत नटांच्या अभिनयकौशल्याचा जितका वांटा आहे तितकाच त्यांच्या सुसंस्कृतपणाचाहि आहे. आणि हा उच्च दर्जा प्राप्त करून देण्याचें श्रेय सर्वस्वीं अण्णांनाच आहे.

—कु. सिंधुताई गोखले

## पुस्तक-परामर्श

**ध्वनिविचार** – ले. डॉ. **नारायण गोविंद** कालेलकर, एम्. ए. डी. लिट्. डेक्कन कॉलेज हॅण्डबुक सीरीज : ५, : डेक्कन कॉलेज पोस्ट ग्रॅज्युएट ॲण्ड रिसर्च इन्स्टिटयूट, पुणें, १९५५, पृष्ठें X + १३ + १९४ + ७ ( चित्रें ), किंमत ५ रुपये.

आजपर्यंत उपलब्ध असलेल्या भाषाशास्त्रविषयक मराठी लेखनांत भाषेविषयीं स्थूलप्रश्नांची चर्चा, यादवकाल, पेशवेकाल इत्यादि कालखंडांतील भाषेच्या स्वरूपाची ओळख, आणि कांहीं शब्दांच्या व्युत्पत्तीचा विचार झाला. मराठीचीं व्याकरणें व व्याकरणविषयक लेखहि पुष्कळसे लिहिले गेले. ज्यूल ब्लॉक यांच्या ‘ La formation de la langue marathe ’ चा ‘ मराठी भाषेचा विकास ’ हा अनुवाद ऐतिहासिक-तौलनिक-भाषाशास्त्राचा उत्कृष्ट नमुना असून निरनिराळया कालखंडांवरील प्रबंध स्थूलमानानें ऐतिहासिक स्वरूपाचे आहेत. व्युत्पत्ति ही ध्वनींच्या ऐतिहासिक अभ्यासाची एक शाखा आहे. तर व्याकरण हें एका विशिष्ट काळांतील भाषा स्थिर आहे असें समजून तिच्या शुद्धाशुद्धतेचा विचार करतें. जुन्या काळीं लिहिलेलें व्याकरण किंवा पूर्वीच्या काळचे ग्रंथ समजण्यासाठीं आणि प्राचीन काळापासून आजपर्यंत अखंडित राहिलेल्या पण बहिरंगीं बदलत असलेल्या भाषिक परंपरेचें यथार्थ ज्ञान होण्यासाठीं स्थितिप्रधान किंवा एककालिक ध्वनींची आणि गतिप्रधान अथवा द्वैकालिक ध्वनि-परिवर्तनांची माहिती असणें आवश्यक असतें. किंबहुना, ध्वनिज्ञान हा भाषाशास्त्राचा पाया आहे.

आपल्या विद्यापीठांमध्यें मराठी भाषेच्या अभ्यासक्रमांत भाषाशास्त्र हा विषय बरींच वर्षें आहे; परंतु सुरवातीसच माहिती असणें जरूर आहे अशा ध्वनिशास्त्रावर मराठींत ग्रंथ झालेला नव्हता. ती उणीव डॉ. **कालेलकरांच्या** या शास्त्रशुद्ध ‘ **ध्वनिविचारा**’नें भरून काढली आहे. एकंदर मराठीच्या भाषाशास्त्रीय अभ्यासाच्या दृष्टीनें हा **ध्वनिविचार** जरी उशिरा प्रकाशांत येत असला तरी भारताच्या क्षितिजावर नव्यानें डोकावत असलेल्या वर्णनात्मक भाषाशास्त्राशीं ओळख करून घेऊं इच्छिणाऱ्या मराठी भाषिकांच्या हातीं हा महत्त्वाचा ग्रंथ वेळेवरच पडत आहे असें म्हटलें पाहिजे.

ध्वनि हा शब्द साहित्य व पदार्थविज्ञान या दोन्हीं शास्त्रांत येतो. कर्णेंद्रियावर विशिष्ट संवेदना घडविणाऱ्या लहरी या अर्थानें तो पदार्थविज्ञानशास्त्रांत वापरतात. हाच अर्थ एका मर्यादित क्षेत्रांत भाषाशास्त्रांतील ध्वनीच्या अभ्यासाला लागू पडतो. भाषाशास्त्रांतील निरनिराळया शाखांना ‘ विचार ’ हा शब्द या ग्रंथांत वापरला असल्यानें भाषेच्या शास्त्रांतील ध्वनिविषयक शाखेचा विचार करणाऱ्या अभ्यासाला ‘ **ध्वनिविचार** ’ हें नांव दिलें आहे, असा खुलासा लेखकानें केलेला आहे.

प्राचीन भारतीयांनीं ध्वनींचें योग्य निरीक्षण व पृथक्करण करून ध्वनिनिर्मितीचे प्रकार व त्यांचीं उच्चारस्थानें यांचें सूक्ष्म वर्णन केलेलें असल्यामुळें वर्णनात्मक ध्वनिविचाराचे ते अध्वर्यु होत. परंतु त्यानंतर या शास्त्रांत कोणतीच भर पडली नाहीं. या विषयावरील आजचें ज्ञान सर्वस्वी पाश्चात्यांच्या परिश्रमाचें फळ आहे. बरोबर शंभर वर्षांपूर्वी म्हणजे १८५६ सालीं ब्रूक् या जर्मन शरीरशास्त्रज्ञानें ध्वनींच्या निर्मितीवरील आपला शास्त्रीय ग्रंथ प्रसिद्ध केला. त्यानंतर चेर्माक्, हेल्महोल्ट्झ्, बेल्, झिफेर्स, स्वीट, रुसलो आणि रास्क्, ग्रिम, पॉट, ग्रासमान, व्हर्नर, शेरर, ऑस्टहॉफ्, ब्रुगमान, सोसूर, श्मिट्, ग्रामाँ व मेय्ये ( १९०१ ) हे होऊन गेले. त्यांच्या कार्याची थोडक्यांत माहिती या पुस्तकाच्या ‘ ध्वनिविचाराचा इतिहास ’ या प्रथम विभागांत दिली आहे.

१ ध्वनिनिर्मिति, २ ध्वनींचा भाषेंत उपयोग, ३ ध्वनिपरिवर्तन, ४ ध्वनिपरिवर्तनाच्या प्रवृत्ती, ५ ध्वनिपरिवर्तनाचा भाषेवर परिणाम, ६ अनपेक्षित

---

१ ‘ डेक्कन कॉलेज पोस्टग्रॅज्युएट ॲंड रिसर्च इन्स्टिट्यूट’मधील भाषाशास्त्राचे एक व्यासंगी **श्री. अशोक रा. केळकर** एम्. ए यांनींहि प्रस्तुत ‘ध्वनिविचार’ या पुस्तकाचें एक चिकित्सापूर्वक समीक्षण केलें असून, तेंहि प्रस्तुत अंकांत प्रसिद्ध करणार होतो. पण स्थलाभावीं तें येथें देतां आलें नाहीं. पुढील मार्चच्या अंकांत तें प्रसिद्ध होईल. — का. सं.








ध्वनिपरिवर्तन, ७ नव्या भाषा, ८ भाषेचें दृश्य स्वरूप : लेखन, ९ लिपीचीं मूलतत्त्वें आणि मराठीचें लेखन, १० परिणामकारी ध्वनिविचार. – अशा दहा प्रकरणांत **ध्वनिविचार** विभागला आहे.

ध्वनि निर्माण होत असतांना फुप्फुसांतून हवा निघून तोंडाबाहेर पडेपर्यंत होणाऱ्या शारीरिक हालचालींची व त्यामुळें ध्वनीवर होणाऱ्या परिणामाची सविस्तर चर्चा पहिल्या प्रकरणांत केली आहे.

ङ्, ञ्, ऋ, ऌ वगैरे वापरांत न येणारे ध्वनि वगळले तर मराठीची ध्वनिसंख्या फक्त ३० भरते. आपल्या लिपीकडे पाहिलें तर सकृद्दर्शनीं हें असंभाव्य वाटतें. पण कोणत्याहि भाषेंत ३०–४० पेक्षां जास्त वर्ण नसतात. एवढ्याशा भांडवलावर भाषाव्यवहार चालण्याचीं कारणें, व लेखनिविष्ट वर्णांचे वस्तुतः उच्चारले जाणारे ध्वनि भिन्न भिन्न कसे असतात याचें दिग्दर्शन दुसऱ्या प्रकरणांत आहे.

आपल्या आजच्या भाषेचें कांहीं काळापूर्वीचें स्वरूप समजण्यास कठीण जातें. याच्या मुळाशीं भाषेमध्यें शब्दांच्या उच्चारांत होत जाणारें ध्वनिपरिवर्तन असतें. ध्वनिपरिवर्तन झालेलें असलें तरी लिपीचा वापर परंपरागत तसाच चालू असतो. या परिवर्तनाचें क्षेत्र व काल यांच्या मर्यादा ठराविक असून त्या मागचीं तत्त्वेंहि निश्चित व नियमित असतात. ध्वनिपरिवर्तनाचे प्रकार आणि भाषाव्यवहार चालू असलेल्या समाजाच्या उच्चारविषयक प्रवृत्तींची भौगोलिक, सामाजिक, राजकीय पूर्वभाषेची पार्श्वभूमि वगैरे दृष्टिकोनानुसार संभाव्य कारणमीमांसा तिसऱ्या प्रकरणांत आहे.

विशिष्ट परिस्थितींतील वर्णांचें विशिष्ट परिवर्तन होण्यास एक ऐतिहासिक व भौगोलिक मर्यादा असते या तत्त्वानुसार प–व, त–द वगैरे वर्णांच्या जोड्या घेऊन ध्वनिपरिवर्तनाच्या प्रवृत्ती लेखकानें स्पष्ट केल्या आहेत. ध्वनिपरिवर्तनाची गति कालप्रवाहाच्या दिशेनें चाललेली असते. परिवर्तन नकळत होत असलें तरी तें नियमित, निरपवाद, अखण्ड व अमर्यादित कसें असतें हें विशद केलें आहे. नव्या रूपांच्या बाबतींत समाजाकडून होणाऱ्या प्रयोगांपैकीं कोणता यशस्वी होईल व कोणता अयशस्वी ठरेल याबद्दल निश्चित दंडक घालतां येत नाहीं. परंतु ज्या तत्त्वाला धरून हीं नवीं रूपें व नवे प्रयोग अस्तित्वांत आलेले असतात त्या तत्त्वांचा, म्हणजे ध्वनिविषयक फरकांच्या बौद्धिक नियमांनीं तयार झालेलीं रूपें ध्वनिपरिवर्तनाच्या नियमानुसार अनपेक्षित अशीं असतात, यांचें विवेचन करतांना सदृशीकरण, विसदृशीकरण व वियोजन या प्रक्रियांचा लेखकानें सांगोपांग ऊहापोह केला आहे.

भाषा व बोली यांच्यांतील क्षेत्रकालसापेक्ष ध्वनिपरिवर्तनाचें निरीक्षण केल्यास या दोहींमध्यें निश्चित भेददर्शक असें फार थोडें असतें, हें लक्षांत येतें. परंतु एखादी बोलीच पद्धतशीर लिपिबद्ध करून शिक्षण, पत्रलेखन, साहित्यनिर्मिति व इतर सर्व व्यवहार यांमध्यें मनोगत व्यक्त करण्याचें स्वाभाविक साधन बनली तर तिला बोली किंवा पोटभाषा न म्हणतां एक नवी स्वतंत्र भाषाच म्हणावें लागेल. बोलणाऱ्या लोकांची संस्कृति व बौद्धिक पातळी यांवर भाषेचें स्थान अवलंबून आहे.

भाषेचें दृश्य स्वरूप जें लेखन त्याचा इतिहास व चिनी लिपि यांची माहिती देऊन, भाषा हळू व नकळत बदलत असल्यामुळें तिच्या सर्व सूक्ष्म अवस्था लिपीनें व्यक्त व्हाव्या किंवा होतील अशी अपेक्षा करणें चूक आहे, परंतु ध्वनिपरिवर्तन श्रुतिगोचर झाल्यानंतरहि त्याचें पूर्वीचेंच लेखन चालू ठेवणें अशास्त्रीय व अर्थशून्य आहे असें मत लेखकानें प्रतिपादिलें आहे.

लिपीच्या मूलतत्त्वांचा विचार झाल्यावर व्यवहारांत आवश्यक असे ध्वनि व मूलतत्त्वें सांगून आणि लेखनांत लागणाऱ्या इतर स्वतंत्र चिह्नांचें वर्गीकरण करून देवनागरी लिपीच्या मराठी भाषेसाठीं होणाऱ्या उपयोगांतील महत्त्वाचे दोष स्पष्टपणें दाखवून मराठीचें लेखन सुलभ व सुबोध होण्यासाठीं कोणत्या प्रकारें लेखन करावें याचें विवेचन नवव्या प्रकरणांत केलेलें आहे.

'परिणामकारी ध्वनिविचार' या शेवटच्या प्रकरणांत संस्कृत, इंग्रजी व मराठींतील गद्य व पद्य उताऱ्यांच्या साहाय्यानें शब्दांच्या अवयवांवर येणारा दाब, ध्वन्यनुकारी शब्दरचना, भाषेंतील नादमाधुर्य यांचें ध्वनिदृष्ट्या पृथक्करण व रसग्रहण करून वाच्यार्थाबाहेरहि जिचें क्षेत्र वाढवितां येईल अशा ध्वनिरचनेचें महत्त्व












दाखवून दिलें आहे.

शास्त्रीय विषयाची सविस्तर चर्चा करणाऱ्या या ग्रंथांत आरंभापासून अखेरपर्यंत परिभाषेचें अवडंबर तर बाजूलाच. परंतु हल्लीं अगदीं रूढ असलेल्या इंग्रजी संज्ञा कंसांतसुद्धां कोठेंहि पहावयास मिळत नाहींत हा या ग्रंथाचा एक महत्त्वाचा गुण आहे. विवेचनाच्या ओघांत सुचलेला शब्द हा मुद्दाम बनविलेल्या पारिभाषिक शब्दापेक्षां अधिक मोलाचा आहे. भाषेंतून शब्द कोशांत आला पाहिजे, कोशांतून भाषेंत नव्हे ही डॉ. कालेलकरांची विचारसरणी अगदीं रास्त आहे.

एकोणिसाव्या शतकांत अस्तित्वांत आलेल्या, समाजजीवनाच्या अभ्यासाला आवश्यक अशा नव्या शास्त्राच्या महत्त्वाच्या अंगाचें दिग्दर्शन करण्यासाठीं हा ग्रंथ लिहिला असून उपलब्ध असलेली माहिती तिच्या शास्त्रीयतेला बाध न आणतां शक्य तितक्या सुबोधपणें मांडली आहे. ध्वनिविचाराचें स्थूल ज्ञान करून देण्यासाठीं लिहिलेला हा ग्रंथ अपूर्णता व दोष यांपासून पूर्णपणें अलिप्त नाहीं याची लेखकाला जाणीव आहे.

भाषा ही एक सामाजिक संस्था आहे. ती देशकाल-परिस्थितीच्या मानानें एकसारखी बदलत असते ही वस्तुस्थिति नजरेसमोरून हालूं न देतां भाषेचें मूलतत्त्व जो ध्वनि त्याचें शास्त्रशुद्ध, सरळ, सुबोध व स्पष्ट विवेचन शंभर टक्के मराठींत मांडणारा हा ग्रंथ लिहून डॉ. कालेलकरांनीं मराठी भाषेंतील अव्वल दर्जाच्या शास्त्रीय वाङ्मयांत मोलाची भर घातली आहे.

-- ( डॉ. ) मु. ग. पानसे

---

## ' नवभारत ' निधि

# -- विनंति --

' नवभारता'ला आर्थिक स्थैर्य लाभून त्याची कार्यक्षमता वाढावी या हेतूनें ' नवभारत ' मासिका-प्रीत्यर्थ किमान पन्नासहजार रुपयांचा निधि डिसेंबर १९५५ अखेर जमविण्याचा प्रयत्न करावा असा संकल्प व तदनुसार एक विनंति-पत्रक १९५५ जानेवारी व फेब्रुवारीच्या ' नवभारता 'च्या अंकांत प्रसिद्ध झालें होतें. त्याप्रमाणें ज्या रकमा ' नवभारत ' निधी-प्रीत्यर्थ जमा झाल्या त्यांची नोंद व पोहोंच ' नव-भारता 'च्या दर अंकांतून गेल्या अंकापर्यंत आलीच आहे.

| | |
|---|---|
| ४८१३- ०-० | देणग्या डिसेंबर १९५५ अखेर |
| १- ०-० | बँक कमिशनकरितां देणगीदाराकडून |
| ३६-१२-० | व्याज |
| ४८५०-१२-० | |

' नवभारत ' निधीचा संकल्प करून गेल्या डिसेंबर १९५५ अखेर एक वर्ष पूर्ण झालें. वर्षांत झालेल्या एकंदर ' नवभारत ' निधीच्या कार्याचा व जमलेल्या ' निधी 'चा विचार करण्याकरितां ' नवभारत ' निधि-समितीची सभा गेल्या ४ जानेवारी १९५६ रोजीं पुणें येथें भरली होती. सभेला श्री. शंकरराव देव हे निमंत्रणा-वरून उपस्थित होते. ' निधि 'समितीसमोर तोंपर्यंत जमलेल्या निधीचा हिशेब सादर करण्यांत येऊन तो मंजूर झाला. तें हिशेबपत्रक पुढीलप्रमाणें :

| | |
|---|---|
| ६५-११-० | छपाई |
| ४६-१३-९ | टपाल खर्च |
| ९- २-० | बँक कमिशन ( चेकवटाव ) |
| ०-१४-० | किरकोळ |
| २१-१४-० | प्रवासखर्च |
| ४४४३-१४-० | बँक ऑफ महाराष्ट्र शिल्लक |
| २६२- ७-३ | रोख शिल्लक |
| ४८५०-१२-० | |











वरील प्रत्रकाप्रमाणें, त्यांत दाखविलेला खर्च वजा जातां 'निधीं'पैकीं रु.४७०६–५–३ इतकी रक्कम शिलकी आहे.

मूळ संकल्पाप्रमाणें निधीची रक्कम जमा होऊं शकली नाहीं. जमा झालेली रक्कम बरीच अल्प आहे याबद्दल 'निधि'-समितीनें आपल्या बैठकींत चिंता व्यक्त केली. समितीच्या सदस्यांच्या वैयक्तिक अपरिहार्य अडचणी व प्रतिकूल बाह्य परिस्थिति यांमुळें निधि जमविण्याकरितां जो जोरानें प्रयत्न व्हावयास पाहिजे होता तो होऊं शकला नाहीं. तरी पण एकंदर परिस्थिति पुढील कांहीं महिन्यांत अनुकूल होण्याचा संभव आहे म्हणून येतें वर्षभर हा 'नवभारत' निधि चालू ठेवावा व त्या अवधींत आपला संकल्प पुरा करण्याची पराकाष्ठा करावी असा समितीनें निर्णय घेतला. निधीकरितां चालणाऱ्या प्रयत्नांचा आढावा घेण्याच्या दृष्टीनें पुन्हां येत्या जूनमध्यें समितीनें आपली बैठक भरवून आपल्या कार्याचा विचार करावा असेंहि ठरलें.

'नवभारत' मासिक पुढें चालू रहावें, त्याची कार्यक्षमता वाढावी या दृष्टीनें त्यास कांहीं आर्थिक स्थैर्य लाभावें याकरितां किमान पन्नासहजार रुपयांचा निधि गोळा करण्याचा संकल्प व त्याकरितां जें एक विनंति-पत्रक प्रसिद्ध झालें तें विदितच आहे. त्या विनंतिपत्रकाखालीं सुमारें ७५वर सह्या असून सह्या करणारांमध्यें डॉ. धों. के. कर्वे, डॉ. मु. रा. जयकर, डॉ. मा. श्री. अणे, श्री. बा. गं. खेर, कै. ना. म. जोशी, श्री. स. का. पाटील, प्रा. ध. रा. गाडगीळ, श्री. केशवराव जेधे, श्री. भाऊसाहेब हिरे, न्या. मू. बा. रा. पुराणिक, श्री. दिगंबरराव बिंदु, श्री. माधवराव बागल, श्री. दा. वि. गोखले, श्री. ग. त्र्यं. माडखोलकर, आचार्य प्र. के. अत्रे, प्रा. शं. बा. दांडेकर, श्री. वि. स. खांडेकर, संत तुकडोजीमहाराज, श्री. ना. ग. गोरे इत्यादि महाराष्ट्रांतील निरनिराळया भागांतील निरनिराळया क्षेत्रांत कार्य करणारे थोर लोक आहेत.

'नवभारत'निधि पुढें येतें वर्ष चालू रहाणार आहे. मूळ विनंतिपत्रकांतील विनंतीस मान देऊन 'नवभारत'-निधीस सर्वांनीं आपल्या शक्त्यनुरूप सढळपणें साहाय्य करावें, अशी आमची प्रार्थना आहे. 'नवभारत'-निधीस १०० रु. ची देणगी देणारास 'नवभारत' मासिक दहा वर्षे मिळत राहील.

'नवभारत' निधीला देणगी देणाऱ्यांचीं नांवें व पोहोंच 'नवभारता'च्या दर अंकांतून कृतज्ञतापूर्वक दिलीं जातील.

'नवभारता'च्या गेल्या म्हणजे जानेवारी १९५६ च्या अंकांत त्या वेळपर्यंत मिळालेल्या देणग्यांची पोहोंच व देणगीदारांचीं नांवें दिलींच आहेत. त्यानंतर आतांपर्यंत ज्यांनीं देणग्या पाठविल्या त्यांचे आम्ही आभारी आहोंत. त्यांचीं नांवें व रकमा पुढें दिल्या आहेत :

| | |
|---|---|
| प्रा. प. वि. पटवर्धन ( पुणें ) | १००–०–० |
| श्री. अशोक रा. केळकर ( पुणें ) | १५–०–० |
| | ११५–०–० |
| मागील शिल्लक | ४७०६–५–३ |
| एकूण | ४८२१–५–३ |

'नवभारत'निधि जमविण्याकरितां पुढील समिति नेमलेली आहे : त. ती. लक्ष्मणशास्त्री जोशी (अध्यक्ष), न्या. मू. भवानीशंकर नियोगी, श्री. देवकीनंदन नारायण, आचार्य स. ज. भागवत, श्री. बाबुराव जगताप, स्वामी रामानंदतीर्थ, प्रा. गोवधन पारीख. प्रा. म. अ. चान्सरकर, श्री. वि. म. बेडेकर ( खजिनदार ), श्री. कृ. ना. फडके व श्री. मा. प. मंगुडकर ( संयुक्त कार्यवाह ).

'नवभारत' निधिसमितीचें कार्यालय 'C/o नवभारत' मासिक, ९०६ शिवाजीनगर, पुणें ४ येथें आहे. देणग्या, "खजिनदार 'नवभारत' निधि-समिति, ९०६ शिवाजीनगर पुणें ४" या पत्त्यावर पाठवाव्यात अशी विनंति आहे.

**लक्ष्मणशास्त्री जोशी** (अध्यक्ष)

२५।१।१९५६ **कृ. ना. फडके**
पुणें ४ **मा. प. मंगुडकर** } कार्यवाह











नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष